# गोंड स्त्रीगीतें



संपादक :

पं. महादेवशास्त्री जोशी



ज्ञानराज प्रकाशन, पुणें २

१९४९

मूल्य दोन रुपये

# पहिलें नमन

कुठून स्फूर्ति झाली आणि काय निमित्त घडलें तें मला आतां आठवत नाहीं. पण गेल्या दोन वर्षांपासून स्त्रीगीतें जमवण्याचा मला छंद लागला. नारीजातीचें हें विखुरलेलें परंपराप्राप्त धन नाण्यानाण्यांनीं गोळा करून आजच्या आणि उद्यांच्या कन्यांसाठीं उपलभ्य करून ठेवावें असें मनानें घेतलें. जुनीं स्त्रीगीतें कुठें जितींजागतीं असतील तर तीं वृद्ध आजी-बाईच्या मुखांत हें मला अनुभवानें ठाऊक होतें. म्हणून मी प्रथम त्यांनाच शरण गेलों. 'अप्रत्याख्यायिनमग्रे भिक्षेताप्रत्याख्यायिनीं वा' या मुंजींतल्या उपदेशाला अनुसरून माझीं जीं कांहीं मायेचीं घरें होतीं तिथेंच मीं प्रथम 'गीतमाधुकरी' मागितली. त्यांनींहि ती प्रेमानें घातली. हळूहळू मग ओळखी-देखीनें मी माझें क्षेत्र वाढवीत गेलों. माझी ही 'पावन भिक्षा' समृद्ध करायला वृद्ध नव्हे, पण पोक्त अशा माता-भगिनींनीहि उदारता प्रकट केली. त्यामुळें आज माझ्याकडे नांव घेण्यासारखा स्त्रीगीत-संग्रह जमला आहे. 'थेंबें थेंबें' तळें सांचलें आहे. आणि त्यांतलींच कांहीं गीतें निवडून मी हें पुस्तक प्रकाशित करीत आहें.

प्रस्तुत संग्रहांतल्या कांहीं गाण्यांच्या शेवटीं कर्त्यांचें नांव नाहीं आणि कांहीं गीतें पुरुषांनीं रचलेलीं आहेत असें आढळून येईल. पण तीं जरी पुरुषी कर्तृत्वाचीं असलीं तरी परंपरेनें तीं स्त्रियांनींच प्रचारांत ठेवलीं म्हणून त्यांना स्त्रीगीतांच्याच सदरांत घातलें पाहिजे. स्त्रियांनीं पाठांतरांत ठेवलेलीं आणि स्त्रियांसाठीं लिहिलीं गेलेलीं या नात्यांनीं पुरुषी गीतांनाहि स्त्रीगीतत्व प्राप्त व्हायला हरकत नसावी. ऋग्वेदांत श्रद्धा नांवाच्या एका स्त्रीनें 'दृष्ट' असें एक सूक्त आहे. वागाम्भृणीचेंहि एक परमात्मसूक्त आहे. पण त्यांना कोणी स्त्रीगीतें म्हणूं शकणार नाहीं. तीं परंपरेनें वैदिकांच्याच मालकीचीं झाल्यामुळें आणि स्त्रियांना वर्ज्य झाल्यामुळें तीं 'पुरुषसूक्तें'च ठरलीं आहेत. तोच न्याय इथें लागू करावा. जुन्या काळीं स्त्रीशिक्षणाचा प्रचार नव्हता तेव्हां स्त्रियांच्या नेमधर्मासाठीं आणि मनोविनोदनासाठीं कविपुरुष त्यांना गाणीं रचून देत. कविश्रेष्ठ मोरोपंतांनीं आपले आश्रयदाते बारामतीकर नाईक यांच्या मुलींना झोपाळ्यावर बसून म्हणण्यासाठीं 'सीतागीत', 'सावित्रीगीत' आणि 'रुक्मिणीगीत' अशीं गाणीं रचून दिल्याचें त्यांच्या चरित्रांत आहे.

यांतलीं 'फुलांचें भांडण' आणि 'अधिकमास' हीं दोन गाणीं वगळल्यास बाकीचीं सगळीं कोणत्या तरी कथाप्रसंगाचीं आहेत. हीं गाणीं निवडतांना मीं एक विशिष्ट दृष्टि स्वीकारली आहे. विज्ञानयुग, यंत्रयुग, युद्धयुग आणि सांस्कृतिक मूल्यांच्या भंजनाचें युग अशीं अनेक युगें चालू काळावर आपला प्रभाव गाजवीत असलीं तरी नारीजातीनें अद्याप आपल्या नेमनिष्ठेला अजीबात फांटा दिलेला नाहीं. श्रद्धायुक्त अंतःकरणानें अजूनहि त्या आपला परमार्थमार्ग चोखाळीत राहिल्या आहेत. एकादशीव्रत हें पुण्याचें निधान असें त्या समजतात. शक्य असेल तिथें त्या एकादशीमाहात्म्य पुराणिकांच्या तोंडून ऐकतात. आणि नसेल तिथें चारचौघी मिळून गाणें गातात. 'रुक्मांगद आणि मोहिनी' हें त्यासाठीं घेतलें आहे. चैत्रागौरीच्या उत्सवासाठीं 'गौरीचें माहेर' निवडलें आहे. सतीत्वाच्या आदर्शासाठीं 'अनसूयेचा' आदर केला आहे. सौभाग्याची वृद्धि करणारा म्हणून 'सतीचा अध्याय' स्वीकारला आहे. स्त्रियांचीं आणखी आवडतीं व्रतें म्हणून 'कोकिळा' व 'अधिकमास' यांची योजना केली आहे.

प्रत्येक गाण्याच्या प्रारंभीं कथासूत्र व परिचय लिहिला आहे. तो लिहितांना नव्या-जुन्या काव्य-शास्त्रांची आणि छंदःशास्त्राची कसोटी मीं या गाण्यांना लावली नाहीं. कठोर टीकाकारांच्या दृष्टीनें त्यांची छाननी केली नाहीं. माझी भूमिका निव्वळ रसिकाची आहे. 'सत्यं शिवं सुंदरम्' शोधणाराची आहे; मी 'कृशानु' नसून 'विश्वावसु' आहें. मला जसे प्रतीत झाले तसे त्यांतले 'रसभाव' मीं यथामति फुलवून दाखविले आहेत.

प्रस्तुत पुस्तकांतलीं गाणीं ज्यांच्याकडून मीं मिळविलीं त्यांच्याविषयीं दोन शब्द लिहिण्याइतकी तरी कृतज्ञता मला दाखविलीच पाहिजे. ज्याचें श्रेय त्याला तें देण्यांत हात कां म्हणून आंखडावा!

'अधिकमास', 'चिंधी', इत्यादि कांहीं गाणीं मला श्री. सौ. मनुताई निजसुरे यांच्या वहींतून मिळालीं आहेत. त्या तीन-चार वर्षांपूर्वी 'परमधाम' पावल्या. धुळ्याला त्यांचें वास्तव्य होतें. त्यांची अभिजात रसिकता पौराणिक आणि आध्यात्मिक कवनांनीं संस्कारी बनली होती. शेवटीं शेवटीं दृष्टि गेली तरी हौस इतकी दांडगी आणि स्मरणशक्ति इतकी तल्लख कीं, छप्पन्न कडव्यांचें 'माघस्नान' त्यांनीं ऐकून ऐकून पाठ केलें. शिक्षण आजच्या युगांत सांगण्या-

सारखं नव्हतें. पण विस्तृत वाचनानें त्यांनीं जो बहुश्रुतपणा संपादिला होता, तो मात्र उल्लेखनीय आहे. महाराष्ट्राच्या ख्यातनाम लेखिका श्री. सौ. मालतीबाई दांडेकर या त्यांच्या कन्या होत. त्या म्हणतात कीं, 'माझ्या लेखनाचा पाया माझ्या आईनें घातला.' त्यांच्या संग्रहांतलीं किती तरी गाणीं मालतीबाईंनीं मजकडे पाठविलीं आहेत आणि पुढेंमागें तीं प्रकाशांत आणण्याची मींहि उमेद धरली आहे. तूर्त या उदार देणगीबद्दल मालतीबाईंचे हार्दिक आभार मानून पुढें जातों.

यांतला 'सतीचा अध्याय' मद्रास येथील श्री. बाबुराव फडके यांच्या पत्नी श्री. सौ. इंदिराबाई फडके यांनीं मला दिला. सतत तीन वर्षें गणेशोत्सवाच्या निमित्तानें मला त्यांच्या घरच्या आतिथ्याचा लाभ घडला आहे. आम्ही त्यांना मावशी म्हणतों. स्तोत्रें, भजनें, प्रार्थना, गाणीं आणि संस्कृत-प्राकृत श्लोक असें त्यांचें बहुरंगी पाठांतर आहे. त्या म्हणतातहि शुद्ध आणि सुव्यक्त. मावशी म्हणजे नव्या-जुन्याचा समन्वय आहेत. त्या दोन घटका एकाग्रमनानें देवाची पूजाहि करतील आणि योग्य वेळीं यजमानांच्याबरोबर क्लबांतहि जातील. मावशींचें घर हें स्वच्छतेचें आणि टापटिपीचें घर आहे. तें पाहुण्या-रावळ्यांना आणि अतिथ-अभ्यागतांना प्रेमादराचा 'पाहुणेर' मिळण्याचें घर आहे. थोडक्यांत सांगायचें तर मावशींचें घर हें 'घर' आहे.

यांतल्या आणखी कांहीं गाण्यांचा लाभ मला माझ्या ती. सौ. सासूबाईंच्याकडून झाला आहे. त्यांचें नांव सौ. जानकीबाई फडके. 'मुखीं नाम हातीं काम' ही त्यांची वृत्ति. जुन्याचें प्रेम पण नव्याचा अनादर नाहीं. स्वतः झिजून दुसऱ्याला सुवास देणें हा गुणविशेष त्यांनीं चंदनाला गुरु करून मिळवला आहे. त्यांच्या जीवनांत हर्ष-विषादांचे अनेक प्रसंग येऊन गेले. पण त्या आपल्या आत्मिक भूमिकेवर 'सुस्थित' आहेत. अंतःकरणाची ऋजुता त्यांच्याकडून शिकावी. निरभिलाष कर्तव्यपालनाचा धडा त्यांच्यापाशीं मागावा.

'गौरीचें माहेर' आणि 'भिल्लीण' हीं दोन गाणीं मला माझ्या भाचीनें दिलीं आहेत. तिचें नांव रुक्मिणी वझे. ती एक हौशी आणि कर्तृत्ववती मुलगी आहे. जिथें जाईल तिथलें वातावरण उत्साहानें भरून टाकील.

---

# अनुक्रम








**आभार —**

हें पुस्तक थोड्या अवधींत सुबक छापून दिल्याबद्दल राजगुरु छापखान्याचे व्यवस्थापक श्री. गानू यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

— लेखक

# अनसूया

## [ कथासूत्र व परिचय ]

ब्रह्मा, विष्णु, महेश म्हणजे या चराचर सृष्टीचें सगळें कांहीं बरेंवाईट करणारे. विधात्यानें जग निर्माण करावें, विष्णूनें तें पाळावें अन् शंकरानें त्याचा संहार करावा अशी त्यांनीं आपसांत कामाची वांटणी करून घेतली आहे. जो अधिकार त्यांचा तोच त्यांच्या बायकांचा. सावित्री, रमा आणि उमा अशीं त्यांचीं नांवें.

एक दिवस त्या तिघी जणी एकत्र जमल्या. उमेनें रमेला गौरविलें. रमेनें सावित्रीची प्रशंसा केली अन् सावित्रीनें इतर दोघींचे गुण गायिले. कोणाचें तेज, कोणाचें सौंदर्य, कोणाचें सामर्थ्य, कोणाचें चातुर्य असें परस्पर गुणगान मनसोक्त झाल्यावर तिघींनींहि एकमतानें ठरवून टाकलें कीं, आपल्या तिघींसारखी सर्वश्रेष्ठ, रूपगुणशालिनी, पतिव्रता स्त्री चौथी कोणी या अलम् दुनियेंत नाहीं. त्रिभुवनाच्या स्वामिनी काय त्या आपणच.

हें त्यांचें बोलणें चाललें आहे, एवढ्यांत नारदाची स्वारी तिथें दाखल झाली. या विश्वमाता एकत्र बसलेल्या पाहून नारदानें त्यांना अष्टौभावें नमस्कार घातला. 'बैस नारदा!' म्हणून त्यांनीं त्याला आसन दिलें. नुकताच त्यांनीं सर्वश्रेष्ठपणाचा टिळा कपाळीं लावून घेतला होता. अर्थात् नारदाच्या मुखांतून त्याला मान्यता मिळवावी अशी त्यांना इच्छा होणें स्वाभाविक होतें. म्हणून त्यांनीं नारदाला प्रश्न केला, "देवर्षे! तुझा त्रिभुवनांत संचार असतो. तेव्हां आम्हांला सांग कीं—

**आम्हांसारिखी। कोण स्त्री त्रैलोक्यीं ?**

नारद म्हणजे मुलखाचा स्पष्टवक्ता. दुसऱ्याच्या मनांतलें गुपित ओळखण्यांत तर तो महावस्ताद. विचारणाराचा जसा रोख तसें त्याचें समयसूचक उत्तर. प्रश्न ऐकतांच त्यानें ताडलें कीं, आज या माउलींना कसली तरी बाधा झाली आहे. यांचें अंतःकरण आज निर्मळ नाहीं. क्षणभरच विचार करून तो म्हणाला—

" तुमच्यासारखी श्रेष्ठ पतिव्रता जगांत आणखी कोण असणार? लोकोत्तर सामर्थ्याच्या अखंड वाहणाऱ्या सरिता तुम्ही—पण..."

" पण काय? तुझं आपलं जिथं तिथं कुस्पट आहेच. तूं कधीं सरळ बोलला आहेस का?"

" मी नेहमीं सरळच बोलतों. पण ऐकणाराला तें सरळ वाटत नाहीं त्याला मी काय करूं? चित्रकूट पर्वतावर मी जें एक नवल पाहिलं तें मी तुम्हांला सागणार होतों; पण तुम्ही मला कुस्पट काढणारा म्हणून शिक्का मारलात तेव्हां आपलं 'मौनं सर्वार्थसाधनम्!'"

" छेः छेः! असं नको करूं. काय पाहिलंस तूं चित्रकूटावर?"

" एक स्त्री!"

" एवढंच? बायका काय, जगांत असंख्य आहेत!"

" पण ही त्यांतली नव्हे. ऐकण्याची इच्छा असेल तर तुम्हांला मी तिची इत्थंभूत हकीगत सांगतों."

" अवश्य सांग." तिघींनींहि उत्सुक होऊन म्हटलें. नारद एक वार 'नाराऽऽयण' असा नामघोष करून सांगूं लागला.

" चित्रकूट नांवाचा एक रमणीय पर्वत आहे. वनश्री माहेरीं आलेल्या मुलीप्रमाणें त्याच्या घरीं हंसते, खेळते. सभोंवतीं मोठमोठालीं शेतं आहेत, शेतकऱ्यांचीं गांवं आहेत. अन् मध्यभागीं हा पर्वत उभा आहे. जणुं धरित्रीच्या शाळुंकेवर उगवलेलं स्वयंभू शिवलिंगच! डोंगरमाथ्यावर एक पर्णकुटी आहे. तिथें वास्तव्य करून अत्रि ऋषि तपश्चर्येचे अदृश्य डोंगर उभारीत आहे."

" अत्रि हा स्वराज्याचा निष्ठावंत भक्त आहे. भारतांत लोकशासित स्वराज्य स्थापन करण्यासाठीं प्रयत्न करण्याचा, झगडण्याचा, आदेश देणारा हाच पहिला लोकाग्रणी. त्यासाठीं त्यानें तुरुंगवासहि भोगला अन् छळवादहि सोसला. पण तरीहि त्यानं आपलं ध्येय सोडलं नाहीं.

**व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये**

या ऋग्वेदांतल्या मंत्रांत या गोष्टीचा उल्लेख आलेला आहे. जसा पुढारी तसाच शास्त्रज्ञ आणि संशोधक. त्याचा खगोलाचा अभ्यासहि दांडगा आहे. पहिलं सूर्यग्रहण वर्तवलं तें त्यानंच."

" मी ज्या स्त्रीची गोष्ट तुम्हांला सांगणार आहें ती या अत्रीची भार्या. पतिव्रताशिरोरत्न म्हणून तिची ख्याति आहे. अनसूया तिचें नांव. ' कोणाची न करी असूया । यालागीं नामें अनसूया ' असूया म्हणजे दुसऱ्याचा मत्सर. हा एक फार मोठा दुर्गुण आहे. पुष्कळ वेळां बायकांना तो फार लवकर झपाटतो. त्याचं उच्चाटन होऊन मन निर्मळ व्हावं म्हणूनच जणुं परमात्म्यानं अनसूयेचा आदर्श निर्माण केला आहे."

" वृत्ति निर्मत्सर झाली कीं मगच तिच्यांत विश्वमांगल्याचा उदय होतो. निःस्वार्थ सेवेची गोडी लागते. अनसूयेच्या चरित्रांत या गोष्टीचें ठळक प्रत्यंतर आहे. चित्रकूटाच्या आसपासच्या भागांत दहा वर्षे अवर्षण पडलं. पावसाच्या अभावीं धरित्री तापली. धान्यंच नव्हेत तर तृणबीजंहि करपून गेलीं. झाडं-झुडपं होरपळलीं. चित्रकूट म्हणजे केवळ दगडा-मातीचा ढीग उरला. हजारों माणसं पटापट मरूं लागलीं. अनसूयेला तो भीषण संहार पाहवेना. तिच्या पदरीं तप होतं. त्याच्या बळावर तिनें चित्रकूट पर्वतावर गंगा निर्माण केली. धो धो प्रवाह वाहूं लागला. त्या पाण्यानं तिनं मळे फुलवले. शेतं पिकवलीं. फळांची समृद्धि केली. आणि तें अन्नब्रह्म भरल्या ओंजळींनीं तिनं दुष्काळग्रस्तांच्या मुखांत घातलं. सर्वांच्या कुडींत प्राण ओतला. या महनीय कृत्यानं ती विश्वजनांची माउली झाली."

हा वृत्तान्त सांगून नारद त्यांना म्हणाला कीं, मला जर विचाराल तर मी स्पष्ट सागेन कीं—

**तिच्या नखाग्रासमान तरि हो तुम्हास कैंचें तेज ?**
**बळें हो चडफडतां तुम्ही यथार्थ वचन माझं !**

इतकें बोलून नारद निघून गेला. पण त्याचे ते शब्द मात्र त्यांच्या हृदयांत घर करून राहिले. आपल्यापेक्षां कोणी श्रेष्ठ स्त्री जगांत आहे ही कल्पनाच त्यांना सहन होईना. त्या तिथून उठल्या अन् जळत-कढत आपल्या निवासस्थानीं गेल्या. थोड्या वेळानें त्यांचे यजमान घरीं आले. पाहतात तों गृहलक्ष्मी दुर्मुखलेल्या. मनधरणी करून रुसव्याचें कारण विचारतांच तिघींनींहि एकच निर्धाराचें वचन सांगितलें.

**अनसूयेसी छळून याल तरीच ठेवूं प्राण**
**नातरि आम्ही कोण तुमच्या तुम्ही आमुचे कोण !**

देवांनीं म्हटलें कीं, 'अनसूया लोकोत्तर स्त्री आहे. तिची छळणा करूं-जाणाराचे हात पोळल्यावांचून राहणार नाहींत. मग तो देव असो अथवा महादेव असो. तुम्ही तिचा उगाच मत्सर करूं नका.'

पण तिन्ही देवांचा उपदेश वायां गेला. त्यांनीं आपला हेका सोडला नाहीं. राजहट्ट, बालहट्ट अन् स्त्रीहट्ट यांत शेवटचाच अधिक भयंकर आहे. त्या एकदां हट्टाला पेटल्या कीं जिवाचे लागेबांधेहि तोडून टाकायला कमी करीत नाहींत. दुराग्रहाची आग पेटली कीं कोंवळ्या भावनांची हिरवळ तेव्हांच करपून जाते. परिणामाकडे नजर पोंचली तर तो हेका कसला ? कैकयीनें रामाला वनवासाला पाठवण्याचा हट्ट घेतला. सीतेनं कांचनमृगाच्या काचोळीचा हट्ट धरला. दोन्ही हट्टांचा परिणाम काय झाला ? अश्रु अन् रक्त !

शक्तीच्यापुढें शिवाला हार खावी लागली. लक्ष्मीपुढें वैकुंठपति अगतिक झाला. सृष्टीचा निर्माता ब्रह्मा स्वतःच सावित्रीच्या हातचें बाहुलें बनला. तिघे एकत्र झाले. रूपें पालटून अत्रि ऋषीच्या गुंफेच्या द्वारीं येऊन उभे राहिले. 'माई ऽऽ भिक्षा वाढ !' म्हणून पुकारा केला.

अनसूया ओंजळींत फळें घेऊन भिक्षा वाढण्यासाठीं आश्रमाच्या बाहेर आली. पण त्या तिन्ही देवांना भिक्षा नको होती. त्यांना हवें होतें तें अनसूयेचें सत्त्व. तिच्या तोंडचा नकार. म्हणून त्यांनीं तिला म्हटलें कीं—

**तंव ते वदती ' नग्न होउनी देशिल तरीच घेऊं**
**नातरि आतां फिरून जाऊं सत्त्व तुमचें नेऊं**

अनसूयेच्या कानीं ते शब्द पडले मात्र; ती आश्चर्यस्तिमित होऊन त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागली. मनःप्रवाह कुंठित झाल्यामुळें देह खांबासारखा निश्चल उभा राहिला. नेत्रपातींहि हालेनात. ते अतिथीच्या रूपानें आले होते म्हणून सुटले. नाहीं तर तिच्या तोंडच्या जळजळीत शापवाणीनें केव्हांच त्यांची तीन चिमट्या राख होऊन वाऱ्यावर उधळली असती.

थोड्या वेळानें जेव्हां ती भानावर आली तेव्हां तिच्यापुढें तीन अतिथीं-प्रमाणेंच दोन प्रश्न उभे राहिले. आतां काय करावें ? नकार घेऊन अतिथि निघून जाणें म्हणजे कुडींतून प्राण निघून गेल्यासारखेंच. अन् त्यांची ती विचित्र मागणी पुरवणें म्हणजे पातिव्रत्याचें जितें मरण ! गृहिणीधर्म अन् पातिव्रत्यधर्म दोन्ही तुल्यबल. दोन्हीहि सतीला अवश्य आचरणीय. जसे

दोन डोळेच. दोहोंपैकीं एक फुटला तरी डोळसपण गेलेंच. शरिराच्या डाव्या-उजव्या अंगांपैकीं एक बाजू जरी लुळी पडली तरी समग्र जीवन विकल होतें अन् असह्यहि होतें. तोच प्रकार या दोन्ही धर्मांच्या बाबतींत.

पण अनसूयेला विचार करायला तरी फार वेळ होता कुठें! 'माई! स्तब्ध कां राहिलीस? हो म्हण अथवा नाहीं म्हण. आम्हांला उशीर होतो.' असा त्या अतिथींनीं तगादा सुरू केला होता. शेवटीं तिनें निर्णय घेतला.

'अतिथीला संतुष्ट करणं हा माझा धर्म. तो मी पाळीन. माझ्या पातिव्रत्याची लाज सांभाळायचं काम पतिरूपी परमेश्वर करील! तो समर्थ आहे!'

दृढ श्रद्धा ही प्राणसखी या वेळीं तिच्या धांवण्या धांवून आली. श्रद्धा ही बळकट नौका आहे. संसाराच्या महापुरांतून तीच पैलपार नेते. मनुष्याची शक्ति अल्प आहे. दृष्टि कोती आहे. ठराविक मर्यादेंत असलेल्या व्यक्ति आणि वस्तुच तो पारखूं शकतो. त्या पलीकडचें जग आणि त्यांतल्या अनुकूल, विरोधी शक्ति यांचा सुगावा त्याला लागूं शकत नाहीं. अशा वेळीं ईश्वराच्या मंगलमयतेविषयीं श्रद्धा नसेल तर त्याचें पाऊल निर्भयपणें पुढें पडणार नाहीं. श्रद्धा ही एक महान् शक्ति आहे. श्रद्धा, भक्ति आणि ध्यान यांत श्रद्धेलाच पहिला पाट मांडलेला आहे. सर्व ऋषींची आणि आचार्यांची श्रद्धेच्या सामर्थ्याविषयीं एकवाक्यता आहे. तो पाश्चात्य कविश्रेष्ठ टेनिसन-सुद्धां निःसंदिग्ध शब्दांत हेंच प्रतिपादितो.

"No help from heaven
That runs through all
The faiths of all the world."

स्त्रिया ह्या स्वभावतःच श्रद्धाळू असतात. याचा एक उत्कृष्ट पुरावा म्हणजे ऋग्वेदांत जें एकच श्रद्धासूक्त आहे तें एका स्त्रीनेंच रचलें आहे. श्रद्धा ही सर्व भाग्यांच्या शिरोभागीं आहे, असें तिनें अधिकृत वाणीनें जगाला निवेदिलें आहे.

याच श्रद्धेनें अनसूयेला कर्तव्याचा मार्ग दाखवला. तिनें अतिथींना म्हटलें कीं, 'तुमच्या इच्छेप्रमाणें करीन.' अतिथि तिच्यामागोमाग आश्रमांत शिरले. तिनें दिलेल्या आसनावर बसले. अनसूयेनें एकवार पतिचरणांचें स्मरण केलें अन् त्यांच्या मस्तकीं हात ठेवला.

आणि काय चमत्कार! ते तिन्ही देव एकाएकीं तीन महिन्यांचीं अर्भकें बनले अन् मुठी चोखूं लागले. अनसूया अद्याप पुत्रसुखाला पारखी होती. हीं तीन गोजिरवाणीं बालकें पाहतांच तिला प्रेमाचा पान्हा फुटला. वस्त्र सोडून ठेवून तिनें त्या तिन्ही बाळांना अंगावर पाजलें. ती आपल्या वचनाला जागली. त्यांची बाळभूक शमली. लगेच त्या आश्रमांत पाळणा लोंबूं लागला. तिन्ही बालकें त्यांत ऐसपैस पहुडलीं. अनसूयेनें पाळण्याची दोरी हातांत धरली. हे तीन अतिथि म्हणजे ब्रह्मा-विष्णु-महेश आहेत हें त्या सतीनें केव्हांच ओळखलें होतें. ती त्यांचे गुण अन् कार्यें आठवून त्यांना अंगाईगीतें गाऊं लागली.

**जो जो निज बाळा। स्वरूपीं लागो डोळा!**

" बा विधात्या! सृष्टि निर्माण करतांना आजवर किती दमला असशील! वैकुंठाधिपति मुकुंदा! त्रैलोक्यपालनाच्या कामीं तुला तर कधींच उसंत मिळत नाहीं. अन् हे कैलासनाथा! तूं तर स्मशानवासी जोगी. तुझ्या वांट्याला आलेलें विश्वाच्या प्रळयाचें कार्य पार पाडतांना तूं संहारतांडव आरंभतोस. तुझ्या त्या भीषण नृत्यानं चौदा भुवनं, सप्त कुलाचल अन् सप्तसागर हुंदळतात. तुझे संधिबंध खिळखिळे होत असतील त्या धुमाळीनं! आतां निजा बरं तिघेहि! आरामाची निचिंत झोंप घ्या. ही तुमची आई तुमच्या लालनासाठीं पदर बांधून उभी आहे—"

असे कितीतरी दिवस लोटले. अनसूयेच्या घरचें बाळपण त्यांना चांगलें मानवलें. ते आपलीं स्थानें विसरले अन् बायकाहि विसरले. त्या बिचाऱ्या वाट पाहून पाहून जेरीस आल्या. काय झालें असेल त्याची त्यांना कांहींच कल्पना येईना. उगवेल तो दिवस निराशेचा, येईल ती रात्र चिंतेची, अशी त्यांची अवस्था झाली.

या सगळ्या प्रकरणाचा निष्कर्ष म्हणून कवयित्रीनें एक सुंदर अर्थांतर-न्यास दाखवला आहे. सामान्यावरून विशिष्ट अथवा विशिष्टावरून सामान्य निर्णय काढणें हें त्याचें ठोकळ लक्षण आहे. ती काय म्हणते तें पहा—

**स्त्रियेअधीन झाले पुरुष त्यांची ऐशी गति**
**अपुलें नासें, हंसें जगाचें, लोक छी छी! म्हणती**

उमा, रमा, सावित्रींना कृतकर्माचा पश्चात्ताप लवकरच झाला. 'आम्हींच

आपलं घर बुडवलं' म्हणून त्या कपाळाला हात लावूं लागल्या. पुढचा मार्ग दिसेना, उपाय सुचेना. अशा स्थितींत पुनश्च नारदाची स्वारी तिथें आली. त्यांनीं त्याच्यापुढें आपलें रडगाणें गाइलें. त्यानें त्यांना त्यांच्या पतींचा वृत्तान्त सांगितला. 'आम्हांला तिथें घेऊन चल' म्हणून त्यांनीं त्याला गळ घातली. तो त्यांना घेऊन चित्रकूटाकडे निघाला.

जातांना कोण त्यांची फजिती! कवयित्री सांगते—

**कंटक जडती केस गुंफती करें सोडवूं जाती**
**आंग चिरूनी शमिच्या झाडा, रक्तें उभ्या नहाती**

दोनच ओळी; पण त्याच्या विपन्नावस्थेचें मूर्तिमंत चित्र डोळ्यांपुढें उभ्या करतात. प्रकृतार्थ व्यक्त करण्याकरतां तिनें योजलेले शब्द उचित अन् समर्थ आहेत. यावर आणखी एक ती सिद्धान्त सांगते—

**एक अभिमान । फिरवी रानोरान!**

आपल्याजवळ कांहीं विशेष आहे असा नुसता भास झाला तरी अभिमानाचा नागोजी डोकें वर काढतो. काजव्याला वाटतें, 'आपल्याच लुकलुकीनें जग डोळस झालें आहे; सूर्याचासुद्धां माझ्यापुढें कोण केवा!' अभिमानाची जात अशीच. लाटण्यासारखा तो ताठ होतो. पाथरासारखा नीरस बनतो. कोणावर फूत्कारेल, कोणाला दंश करील, तर कोणाला शेपटीचा तडाखा मारील. खोरें आपल्याकडे माती ओढतें तसा अहंकार जगांतलें सगळें मोठेपण आपल्याकडे ओढूं लागतो. पण याच खटाटोपांत एक दिवस त्याचें तोंड काळें होतें.

त्या तिघी विश्वस्वामिनी शेवटीं याच अवस्थेला आल्या. चित्रकूट पर्वतावर येऊन त्यांना अनसूयेचे चरण धरावे लागले. तिनें त्यांची विचारपूस केली. त्यांच्या आगमनाचा हेतु जाणून घेतला.

**नको पाहुं निर्वाण। देईं चुडे दान!**

या त्यांच्या करुण वाणीनें तिचें हृदय द्रवलें. तिनें तिन्ही बाळें आणून त्यांच्यापुढें ठेवलीं अन् म्हटलें, 'तुमचे तुम्ही ओळखून घ्या!' पण त्यांना आपल्या पतीची ओळख पटेना. त्या भांबावल्या अन् शेवटीं रडकुंडीस आल्या.

अनसूयेनें तीर्थजल शिंपडतांच त्या तिन्ही बालकांतून तीन देव निज-

रूपानें प्रगट झाले. उमा-रमा-सावित्रींच्या अंतरांत आनंदाचे कल्लोळ उठले. तिन्ही दांपत्यांनीं अनसूयेला वंदन केलें. देव म्हणाले—

" माते, तुझा महिमा थोर! आम्ही विश्वचालक सर्वसत्ताधीश खरे; पण आम्हाला आई नव्हती. आईचं सुख कसं असतं त्याची आम्हांला कल्पनाहि नव्हती. तूं आमची आई झालीस. आम्हांला प्रेमपान्हा पाजलास. आम्हांला तुझा पदर सोडून जाववत नाहीं. हा मायेचा आसरा सोडवत नाहीं. पण विश्वचक्र चालवण्याची जबाबदारी आमच्यावर आहे. आम्ही इथून गेलों तरी अंशरूपानं तुझे पुत्र म्हणून राहूं."

अनसूया ऐकते, पाहते, इतक्यांत ते तिन्ही देव आपल्या स्त्रियांसह एकदम अदृश्य झाले. अन् या कवयित्रीचें काव्यहि इथेंच समाप्त झालें.

हें गाणें ज्या कथेवर आधारलेलें आहे, त्या कथेंत एका नव्या संप्रदायाचा उगम दाखवलेला आहे. हा संप्रदाय म्हणजे दत्तसंप्रदाय होय. महाराष्ट्रांतला हा एक मोठा संप्रदाय आहे. महाराष्ट्रांत शैव आणि वैष्णव असे झगडे माजले होते. वैष्णव विष्णूच्या उपासनेबरोबरच शैवांची निंदा-नालस्तीहि करीत होते. शैवहि त्याच मार्गानें वैष्णवांना प्रत्युत्तर देत होते. वैष्णवांनीं शिवरात्रीच्या दिवशीं पुरणपोळीचें जेवण करावें अन् शैवांनीं आषाढी-कार्तिकी एकादशीच्या दिवशीं कांद्याचें थालिपीठ लावून खावें, असले वेडेचार सुरू झाले होते. उभयपंथांतला विरोध अगदीं टोंकाला गेला होता.

अशा रीतीनें एकसंध समाजांत जेव्हां फुटीर वृत्तीचें भगदाड पडलें तेव्हां त्याच्यापुढें एक नवा आदर्श, एक नवा परमेश्वर उभा करणें समाजांतल्या विचारवंत महापुरुषांना भाग पडलें. आणि त्यांच्या त्या प्रयत्नांतून दत्तात्रेय निर्माण झाला. दत्त म्हणजे 'त्रिगुणात्मक त्रयमूर्ति.' दत्तांत विष्णुहि आहे अन् शिवहि आहे. आणि त्यांच्या जोडीला ब्रह्माहि. हरिहरांची एकरूपता म्हणजेच दत्त. शैवांनीं त्याला शिवरूपानें पहावें अन् वैष्णवांनीं त्याला विष्णुरूपानें भजावें. उपास्येंच जिथें एकरूप झालीं तिथें उपासकांना एकरूप होणें, निदान आपसांतलें वैर तरी सोडून देणें क्रमप्राप्तच.

श्रीपाद श्रीवल्लभ आणि नृसिंहसरस्वती हे दत्ताचे दोन अवतार चौदाव्या शतकांत अनुक्रमें झाले. त्यांनीं आपल्या लीलाचरित्रांनीं आणि ज्ञानोपदेशानें

समाजाला सन्मार्गाचें वळण लावलें. गुरुचरित्र हा या संप्रदायाचा प्रमाणभूत ग्रंथ. दत्तोपासना ही विशेतषः महाराष्ट्रांतच आहे. गाणगापूर, औदुंबर, नरसोबाची वाडी हीं प्रसिद्ध जाज्ज्वल्य दत्तक्षेत्रें महाराष्ट्रांतच आहेत. गाणगापूर भीमेच्या तीरीं, औदुंबर कृष्णाकांठीं आणि नरसोबाची वाडी कृष्णा-पंचगंगा-संगमावर वसली आहे.

‘ भेदाभेदभ्रम अमंगळ ’ असें तुकोबा म्हणतात. अधर्महि तोच. आणि त्याचें जेव्हां अभ्युत्थान झालें, तेव्हां जनांना अद्वैताची मंगल साधना शिकवण्यासाठीं दत्तात्रेय अवतरला. दत्ताचे पुष्कळसे अवतार मुसलमानी राज्यांतच झाले आणि त्यांनीं हिंदुहिंदूंतच नव्हे तर हिंदु आणि मुसलमान या भिन्नधर्मीयांतहि सलोखा निर्माण करण्याचा प्रयत्न केला अन् तो त्या काळीं पुष्कळ अंशीं यशस्वीहि झाला.

---

## अनसूया

लक्षुमी-सावित्री-गौरी कोणे एके दिवशीं
गर्व करुनी म्हणती, ‘ चौथी नाहीं आम्हां ऐशी
त्रिभुवन स्वामीनी । आम्ही तिघी जणी ! ’ १
तों तेथें अकस्मात आले नारद मुनी
गौरवूनी अती आदरें पुसती त्यालागूनी
आम्हासारिखी । कोण स्त्री त्रैलोक्यीं ? २
वदे नारदहि ‘ तुम्हां ऐशी मजला न दिसे कोठें
चित्रकूट पर्वतीं परी मीं नवल देखिलें मोठें
तें मी सांगेन । ऐका चित्त देऊन ३
अत्रि ऋषीची भार्या नाम अनसूया तिचें
रूपलावण्यगुणैकराशी काय वर्णू सतीचें
सत्त्व अधिक । अनसूया ती एक ४

तिच्या नखाग्रासमान तरि हो तुम्हांस कैंचें तेज
बळें हो चडफडतां तुम्ही यथार्थवचन माझं !'
इतुकें सांगूनी । गेले नारदमुनि ५

खेद मानिती तिघी जणी बहु श्रमल्या त्या मनीं
तोंवरि देव येते झाले आपुल्या निजभुवनीं
पुसती स्वकांते । न बोलती त्यांतें ६

नाना गौरव देउनि वदती खेद कासयाचा
तिघी जणी त्या वदती पतिशीं 'आम्हांस मान कैंचा ?
जळो ऐसें जीणें । आम्हां लाजिरवाणें ७

अनसूयेसी छळूनि याल तरीच ठेवूं प्राण
नातरि आम्ही कोण तुमच्या तुम्हीं आमुचे कोण !
याहुन मरण । येतां बरवें जाण ' ८

अवश्य म्हणुनी ब्रह्माविष्णूसदाशिवादि वेगें
अनसूयेसी छळावयाला देव चालले तीघे
रूप पालटीती । होउनियां अतिथि ९

तिघे जाउनी गुंफेद्वारीं भिक्षाशब्दा वदती
फळें घेउनी आली तेव्हां अनसूया ती सती
म्हणे ' फळांची । भिक्षा घ्या हो साची ' १०

तंव ते वदती ' नग्न होउनी देशिल तरीच घेऊं
नातरि आतां फिरून जाऊं सत्त्व तूमचें नेऊं
वेळ न लावीं । भिक्षा आम्हां द्यावी ! ११

अनसूयेनें तिघां जणांच्या शिरीं ठेविला हात
तत्काळाचि ते हरि-हर-ब्रह्मा बाळ जाहले तेथ
धन्य निजनिष्ठा । चमत्कार हो मोठा १२

अनसूया तीं तिघें बाळकें निजवि पाळण्यांत
भक्तीभावें वामनकीर्ति अनसूया ती गात
जो जो निज बाळा । स्वरुपीं लागो डोळा १३

ऐकें उत्तर परमेष्ठी तूं स्थीर करूनी चित्त
सृष्टीकरतां बा माझ्या रे ! भागलास तूं बहुत
जो जो निज बाळा । स्वरुपीं लागो डोळा १४

अरे मुकुंदा भक्तांसाठीं घेसी बहु अवतार
त्रैलोक्याचें पालन करितां भागलास बा फार
जो जो निज बाळा । स्वरुपीं लागो डोळा १५

अरे शिवा तूं संहारक तुज प्रपंच कैंचें सदन ?
स्मशानवासी सर्वांगासी विभुतीचें उधळण
जो जो निज बाळा । स्वरुपीं लागो डोळा १६

अनसूयेनें कितीक दिवस पाळियल्या त्रैमूर्ती
उमा, रमा, सावित्री तीघी पतिविण शोका करिती
जीवनावेगळ्या । जैशा त्या मासोळ्या १७

स्त्रियेअधीन झाले पुरुष त्यांची ऐशी गती
अपुलें नासें हंसें जगाचें लोक छी छी ! म्हणती
ऐसें होऊं नये । अधिक बोलूं नये १८

‘ दरिद्रबुद्धि धरूनि आम्हीं स्वामी लावुनि दीले
कोणीं आमुचें काय केलें ! आम्हींच घर बुडवीलें ! ’
ऐशा विलपती । नारद आले तेथें १९

‘ अरे नारदा, आम्हांसि न्याव्या अनसूयेचे भुवनीं
तुझ्या प्रतापें एक वेळ तरि स्वामी पाहूं नयनीं ’
नारद तीघी जणी । चालीले घेऊनी २०

दरेखोरीं गिरीपर्वतीं फिरतां संकट मोठें
पाय दूखती खडे रूपती त्यावरि रुतती कांटे
ऐसा गळांठा । झाला त्यांचा मोठा २१

कंटक जडती केस गुंफती करें सोडवूं जाती
आंग चिरूनी शामिच्या झाडा रक्तें उभ्या नहाती
एक अभिमान । फिरवी रानोरान २२

तिघींसहित मुनी पातले चित्रकूट पर्वत
अत्रिऋषीची गुंफा दावुनि आपण झाले गुप्त
तंव त्या तीघी जणी । लागती चरणीं २३

पुसे अनसूया ‘ तुम्ही कोण कैंच्या येथें
काय निमित्तें येणें घडलें संकट बहु तुम्हांतें
ऐशी अनसूया । धन्य ईश्वरी माया २४

तंव त्या वदती ‘ माते आमुची विनंति अवधारीं
पतीवियोगें श्रमतों आम्ही उमा, रमा, सावित्री
नको पाहुं निर्वाण । देई चूडेदान २५

अनसूयेनें तिन्ही बाळकें आणुनि ठेविलीं पुढें
'घ्या ओळखुनी पती आपुले अक्षै राहो चूडे
हेची प्रार्थना । तुम्हांलागी जाणा ' २६

तिन्ही बालकें एकसारखीं ओळखुं येति न पती
चिंताक्रांत होऊनियां अनसूये विनवीती
अतार पूर्ववत । करुनि देईं त्वरित २७

अनसूयेनें कमंडलूंतुन उदक तें शिंपीले
तीघे बाळ पूर्ववत् केले ज्यांचे त्यांना दिले
धन्य निजनिष्ठा । पराक्रम मोठा ! २८

तेच आपुले स्थानीं जातां वदती तीन्ही देव
' तुझीं बालकें होउनि राहूं हाचि मानसीं भाव
मातें निरोपावें । स्वसुखें वसावें ' २९

---

# गौरीचें माहेर

## [ कथासूत्र व परिचय ]

हें लहानसें गाणें कोण्या अनंत गोपाळ नांवाच्या कवीनें गौरीच्या माहेर-वासावर रचलेलें आहे.

माहेर म्हणजे मायेचें–आईचें–घर. माहेर हें स्त्रियांच्या जीवनांत एक मोठें विसाव्याचें स्थान आहे. मुलीची लडिवाळी पूर्ण व्हायची ते माहेरींच. स्वच्छंद नाचणें-बागडणें व्हायचें तेंहि माहेरींच. तिथें कांच नाहीं कीं जाच नाहीं. तिथल्या वागणुकीवर सासूची करडी नजर नसते; तर माउलीची कौतुकानें तुडुंबलेली दृष्टि असते. तिथें सासऱ्याच्या दराऱ्यानें उत्पन्न होणारा संकोच नसतो; तर बापाच्या मायाममतेचा विश्वास असतो. माहेरच्या राहण्यानेंच नव्हे; तर स्मरणानेंसुद्धां स्त्रियांच्या हृदयांत सुखोर्मि उसळतात. माहेरचें सुख सांगून पुरवत नाहीं असें आहे. त्याला उपमा त्याचीच.

म्हणूनच संत पंढरीला माहेर म्हणून संबोधतात. तत्त्वज्ञानी मृत्यूला माहेर म्हणून कवटाळतात. मुमुक्षु जन सद्गुरूला माहेर म्हणून गौरवतात. संसार हा सागर, काम हा दादला, अहंकार हा सासरा, कल्पना ही सासू आणि या सर्वांच्या जाचांतून सोडवणारें 'हरिपद' हें माहेर अशा रूपकाचीं कितीतरी काव्यें महाराष्ट्रांतल्या लहान-मोठ्या कवींनीं आणि कवयित्रींनीं रचलेलीं आहेत. 'मज न्यावें माहेरासी' हा एकच आर्त धांवा त्यांत ऐकूं येतो.

'माहेर' ही भावना अत्यंत हृदयंगम आणि उल्हासप्रद आहे, पण एवढ्या धनंतर संस्कृत वाङ्मयांत तिची उपेक्षा झालेली दिसते महाकवि व्यासवाल्मीकिहि त्या बाबतींत मुग्धच राहिले आहेत. सीता–सावित्री, सुभद्रा–दमयंती या नवोढा कधीं माहेरीं गेल्याच का नसतील ? त्यांच्या आयांची माया त्यांच्यावर 'चहूंधारीं' वर्षलीच का नसेल ? पण त्यांचीं सुरस आख्यानें रचणाऱ्या संस्कृत कवींना मुलींना 'माहेर' म्हणून एक अत्यंत आवडीची वस्तु असते याची दखलगिरीच नसावी. नाहीं म्हणायला कालिदास तेवढा या बाबतींत अपवाद आहे. सासरीं साम्राज्य मिळणार असलें तरी

मुलींना माहेरच्या लहान-सहान व्यक्तींचें आणि वस्तूंचें किती प्रेम वाटतें तें कालिदासानें शाकुंतलाच्या चौथ्या अंकांत शकुंतलेच्या मुखांतून वदवलें आहे. ती सख्यांना म्हणते—'मी या वनज्योत्स्नेला तुमच्या हातीं निरवून जातें. तिला संभाळा हं!' ती कण्वाकडे वळून म्हणते, 'आपल्या आश्रमांतली हरिणी गर्भारशी आहे. ती सुखरूपपणें बाळंतीण झाली कीं मुद्दाम कोणाला तरी पाठवून मला कळवा हं!'

संस्कृत वाङ्मयांतली ही उणीव प्राकृत काव्यांत थोड्याफार अंशानें दूर झाली आहे. प्राकृत कवींना निदान माहेराचें माधुर्य तरी प्रतीत झालें होतें यांत वाद नाहीं. ज्ञानेश्वरमाउलीनें

**कीं जे ललेयाचे लळे सरती**
**मनोरथांचे मनोरथ पुरती**
**जरी माहेरें श्रीमंतें होती**
**तुम्हां ऐसीं**

अशी ओवी लिहून माहेराची अपूर्वाई दाखवली आहे.

**क्रीडावें मुक्तींनीं माहेरीं जेविं लाडक्या मुलिंनीं**

अशा आर्या लिहून पंतांनीं माहेरावर अलंकार चढवले आहेत.

**दाटलें हें घन माहियेर**

अशी तुकोबांचीहि अभंगवाणी प्रगटली आहे. या बाबतींत महाराष्ट्रांतल्या मायबहिणींची कामगिरी तर अपूर्वच आहे. माहेर या भावनेचा सर्वांगीं विकास करून त्यांनीं तिला रसपदवी दिली आहे.

जुन्या काळीं दळण घरीं दळलें जात असे. पहांटेच्या 'रामपारीं' पहिला कोंबडा आरवला कीं बायका दळण मांडीत. मुलें-माणसें अजून उठायचीं आहेत अशा त्या एकान्ताच्या समयीं जात्याची घरघर सुरू झाली कीं त्या सुखावह नादाशीं दळणाऱ्या स्त्रिया एकतान होत. आणि मग त्या तन्मय वृत्तींतून सहजपणें काव्य ओसंडूं लागे. ओवी हा त्याचा साधाभोळा छंद. पति-पुत्र, घरदार, मुलेंलेकरें, सासर-माहेर हे त्यांतले नित्य परिचित विषय. सुखदुःखाच्या अनुभवाचें सार त्यांत सांपडायचें. साध्याच पण उत्कट अशा भावना त्यांत रंगून निघायच्या.

या ओवीवाङ्मयांतून ‘ माहेर ’ आणि ‘ मायलेकी ’ या विषयाच्या ओव्या वेगळ्या काढून पू. सानेगुरुजींनीं आपल्या ‘ स्त्रीजीवन ’ या संग्रहांत दिल्या आहेत. त्या इतक्या बहारीच्या आहेत कीं, प्रथितयश कवींनींहि अंतरीं उल्हासून मान डोलवावी. त्या वाचून अथवा ऐकून प्रेमळांचे डोळे ओले झाल्यावांचून राहणार नाहींत. वात्सल्य आणि कारुण्य या दोन रसधारा एकजीव होऊन त्यांत एक नवाच रस सिद्ध झालेला आहे.

‘ गौरीचें माहेर ’ हें गाणें ज्या काळचें आहे त्या काळीं सामाजिक परिस्थिति आजच्यापेक्षां किती तरी भिन्न होती. तेव्हां मुलगी ‘ अष्टवर्षा ’ झाली कीं एकदोन वर्षांत तिचें ‘ शुभमंगल ’ व्हायचें. परकरी मुलगी नऊवारी साडींत वेढली जायची. ती सासरीं जायची ती ‘ परक्याचें घर ’ म्हणून. पति आणि संसार याविषयींचें तिचें ज्ञान भातुकलीपुरतेंच असायचें. सासरीं ढकलली गेल्यावर तिला फक्त एकच ध्यास असायचा तो हा कीं, ‘ मायेचा दुकाळ ’ असलेल्या या घरांतून मी केव्हां एकदां माहेरीं जाईन ! त्यासाठीं ती दिवस पळें मोजीत बसायची. न्यायला आलेला ‘ माघारी ’ तिला ‘ पंढरीचा पांडुरंग ’ वाटायचा. ‘ आवळा खाऊन पाणी प्यावें अन् माहेरीं जावें.’ ‘ सासरींच्या वाटे कुचकुच कांटे, माहेरींच्या वाटे हरि भेटे.’ अशा ज्या म्हणी बनल्या आहेत त्या तत्कालीन मुलींच्या माहेरविषयक भावनेवर प्रकाश पाडतात.

माहेरचीं प्रमुख माणसें दोन. बाप अन् आई. पण दोघांच्या भावनांत किती अंतर ! मुलीला पिवळी करून वराच्या हातावर उदक सोडलें कीं ‘ ज्याचं देणं त्याला देऊन मोकळा झालों ’ अशा वृत्तीनें बाप ‘ स्वस्थ ’ होतो ; पण आईला एक नवीनच चिंता जाचूं लागते.

**बापें दिल्या लेकी । आपण बसले सुखें ओटी**
**मायेला चिंता मोठी । वागण्याची**

मुलगी सासरीं कशी वागत असेल आणि सासरचीं माणसें तिला कशी वागवीत असतील ही हुरहुर तिला सोडीत नाहीं. मुलीचा जीव जसा माहेरीं तसा आईचा तिच्या सासरीं ओढ घेत असतो. दुसऱ्याच्या सत्तेचा झालेला आपला पोटाचा गोळा केव्हां एकदां परत येऊन भेटतो असें तिला होऊन जातें. आणि अशा स्थितींत जेव्हां मुलगी माहेरीं येऊन मायलेकींची भेट होते, तेव्हां दोन ‘ जवळिकेचीं सरोवरें ’ उचंबळून एकमेकांत ओतप्रोत

झाल्यासारखें तें दृश्य दिसतें. मग मुलीच्या कौतुकाला सीमा उरत नाहीं. तिच्याशीं बोलतांना आईची रसना प्रेमामृतानें ओलावते. ती लेकीला म्हणते—

"माहेरीं आली आहेस. कामधंद्यासाठीं पदर नको आवळूं. हास, खेळ अन् जीव रमव. नुकतीच सकाळ झाली आहे, 'गुरंगुटी' करून झोप थोडा वेळ. आज तुझ्यासाठीं पिकला आंबा चिरीन. तुला दुधावरची साय देईन. इथें आहेस तंवर थोडं मांस येऊं दे अंगावर."

प्रस्तुतच्या गाण्यांत मायलेकींच्या अशा मधुर प्रेमाचा रसाळ आविष्कार झालेला आहे. आतां आपण त्याच्या अंतरंगांत शिरून तिथली थोडी गोडी चाखूं.

कैलासनाथ पति मिळावा म्हणून पार्वतीनें अत्युग्र तप आचरिलें. शंकरानें प्रसन्न होऊन तिचें पाणिग्रहण केलें. पार्वती कैलासाची स्वामिनी झाली. मदनदहन शंकर तिच्यासाठीं लीलाविनोदांत रस घेऊं लागला. कैलासाचा कंटाळा निघाला. दऱ्याखोऱ्यांतून साद-प्रतिसाद उमटले. पार्वतीचा स्त्रीसुलभ संकोच शंकरानें दूर केला. शंकराची उदासीन वृत्ति पार्वतीनें आटोक्यांत आणली. कैलासपति 'रुद्र' होता तो 'शिव' झाला. उभयतांनीं निरागस सुख दिलें-घेतलें.

नव्या नवलाईचे असे कांहीं दिवस 'खेळीमेळींत' गेल्यावर पार्वतीला माहेराची आठवण झाली. तिनें माहेरीं जाण्यासाठीं शंकराकडे अनुज्ञा मागितली. शंकर मनांत चमकला. पत्नीला माहेरीं पाठवून तो एकदां चांगलाच पोळला होता. पूर्वाश्रमींची त्याची सहचारिणी गौरी हट्ट धरून माहेरीं गेली होती ती तिथेंच देहत्याग करून मोकळी झाली होती. आणि आज पार्वतीनेंहि तोच प्रस्ताव केला होता. शंकराच्या मनांत तिला पाठवावयाचें तर नव्हतेंच; पण नकारहि देववत नव्हता. तो म्हणाला—

"प्राणवल्लभे, कशाला जातेस माहेरीं? तूं माहेरीं गेलीस कीं रंगाचा बेरंग होईल. बसलेला मांड बिघडेल. मला तुझ्यावांचून 'न गमे घडी' असं होईल. इथें तुला काय कमी आहे बरं?"

त्यावर पार्वतीनें उत्तर केलें, तें जितकें समर्पक तितकेंच हृदयंगम आहे.

आम्हा स्त्रियांच्या हो जाती
सासुऱ्याची अति संपत्ति
तरी माहेरिंची प्रीति
मायबापा भेटावें

"स्वामी, सासर जरी कुबेराच्या वैभवाचं असलं तरी आम्हा बायकांच्या जातीला माहेरची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. आई-बापांना भेटण्याची, त्याच्या छायेखालीं विसांवा घेण्याची आम्हांला अतिप्रीति असते." 'माहेरची पेज अन् सर्वांगीं तेज' अशी कोंकणांत म्हण आहे. तिच्यांतला 'सर्वांगीं' हा शब्द महत्त्वाचा आहे. माहेरची पेज शरीराप्रमाणेंच मनालाहि तेज आणते. चार दिवस माहेरीं राहून मुली टवटवीत होतात अन् उत्साहाची शिदोरी बरोबर आणून परत संसाराचा गाडा ओढूं लागतात. पार्वती पुढें म्हणते—

"मला तुमचा निदिध्यास लागलेला आहे. तुमच्या ध्यानाचं अन्न आणि चिंतनाचं पाणी यांवरच माझं जीवन चाललं आहे. तुम्हांला सोडून फार दिवस मला राहणं शक्यच नाहीं. 'जीवनावेगळी मासोळी' जीव धरूं शकत नाहीं. मी लवकरच परत येईन. मग पाठवालनों मला? 'भक्तांच्या मनींचे मनोरथ' पुरविणारे अशी तुमची ख्याती आहे. मग मी तर तुमची वल्लभाच."

अग्न्यस्त्रावर पर्जन्यास्त्र चालतें. पर्जन्यास्त्रावर वातास्त्र उपयोगी पडतें. पण रमणीच्या मोहनास्त्रावर कोणती मात्रा! शेवटीं शंकरानें तिला जाण्याची अनुज्ञा दिली. पार्वतीनें लगेच नंदी पालाणला. शिवगणांच्या दळभारासह निघून ती योग्य वेळीं पर्वतपुराच्या वेशींत आली. नगरपालकांनीं धांवत जाऊन हिमाचलाला वर्दी पोंचवली. निशाणाला घाव देऊन हिमाचल तिला सामोरा गेला. पार्वती राजवाड्यांत आली. तिथें मेनाराणी डोळ्यांच्या पणत्या करून बसली होती. मायलेकींची भेट झाली. हिमाचलावर एक गंगोत्री होतीच. आतां दुसरी माउलीच्या डोळ्यांत अवतरली. तिच्या हृदयाचा दूर गेलेला तुकडा परत येऊन सांधला. ती म्हणाली—

काय हें सुवर्ण घरासी आलें
केवढें निधान सांपडलें

**आळश्या गंगोदक आलें**
**घरामाजी तयाच्या**

कवीनें या चारच ओळींत मातृहृदयाचा गाभा उलगडून दाखवला आहे. बोलावणें जायच्या आधींच मुलीला माहेरीं पाठवल्याबद्दल मेनाराणीला जांवयाचें कौतुक वाटलें. असे जांवई सासवांचे फार लाडके होतात. मुलीपेक्षांहि त्यांना सासूचें प्रेम अधिक मिळतें. पंतानीं एका आर्यैंत हाच आशय सांगितला आहे.

**त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक सुतासूनुपरिस जामाता**

शंकराचा सासुरवाडीकडचा ओढा अन् आपल्या मुलीचे लाड चालविण्याची ही तत्परता पाहून, महाराष्ट्रांतल्या एका माउलीप्रमाणें मेनाराणीहि म्हणाली असेल —

**भोळा कीं ग भ्रतार**
**माझ्या उमा ग बाईचा**
**तिनें पिंपळ दारींचा**
**पूजीयेला**

'माय बघी पोट' असा एक वाक्प्रचार आहे. आनंदाचा पहिला पूर ओसरल्यावर मेनाराणीला जाणीव झाली कीं, पोर भुकेनें व्याकुळली असेल. तिच्या राजवाड्यांत बल्लवांना तोटा का होता ! पण आज ती त्यांच्यावर विसंबायला कबूल नव्हती. घाईघाईनें अंग धुवून तिनें चुली पेटवल्या. थोड्याच वेळांत पाकसिद्धि झाली. बाहेर येऊन तिनें आपल्या यजमानांना म्हटलें—'उठायचं नाहीं का आतां !'

**माय म्हणे ग भुकेली**
**वेगें करा हो आघोळी**

हिमाचल स्नान करून येतो तों 'षड्रस अन्नाचीं ताटें विस्तारून' तयार होतीं. बापाच्या शेजारीं मुलगी जेवायला बसली. सगळे पदार्थ आवडाचे अन् त्यांतूनहि माउलीच्या हातचे. पार्वतीला काय खाऊं अन् काय नको असें झालें.

जुन्या काळीं आपल्याकडे कोणते पाकपदार्थ रूढ होते त्याच्या लांबलचक याद्या प्राकृत वाङ्मयांतून मिळतात. मुक्तेश्वर, एकनाथ, इत्यादि आपले कवि

याहि बाबतींत पट्टीचे रसिक होते. अनंत गोपाळानेंहि या गाण्यांत छोटीशी यादी दिलीच आहे. वरणभात, त्यावर 'सद्योघृत' म्हणजे लोणकढें घमघमीत तूप अन् भुरकायला वाफा येत असलेली ताकाची कढी, हें जुन्या काळापासून महाराष्ट्रीय भोजनांतलें मुख्य आकर्षण आहे. शिवाय त्या काळीं दूधदुभतें समृद्ध असल्यामुळें नानाप्रकारच्या खिरींवर अधिक तडाखा होता. असो.

हस्तप्रक्षाळण करून पार्वतीनें मुखांत विडा रंगविला आणि ती दोल्हाऱ्यावर येऊन बसली. तो खास माहेरवाशिणीसाठीं लोंबवला होता. त्याच्या खांबांना इंद्रनीळ अन् माणिक-मोत्यें जडविलीं होतीं. त्यांतून प्रकाशाचे नानारंगी किरण फांकत होते. पार्वती त्यावर बसतांच त्याची शोभा ओसंडूं लागली. पदर वाऱ्यावर सोडून अन् पाय ताठ करून जेव्हां ती लांब झोके घेऊं लागली तेव्हां पाहणारांना ती मूर्तिमंत विद्युल्लताच वाटली.

पार्वतीचा तो माहेरवासाचा एक महिना क्षणासारखा गेला तर तिकडे शंकराला युगें लोटल्यासारखीं वाटलीं. त्यानें वाट पाहून पाहून गणपतीला 'मूळ' पाठवलें. हिमाचलानें त्याचें उत्तम स्वागत केलें. त्याच्यासाठीं मोदकांची मेजवानी झाली. त्याला शेलापागोट्याचा अहेर मिळाला.

मेनाराणी जड अंतःकरणानें पाठवणीच्या तयारीला लागली. तिनें नाना खाद्यपदार्थांच्या दुरड्या तर भरल्याच; पण त्याशिवाय प्रवासांत मुलीला पित्त होऊं नये, तहान लागूं नये, पोटांत मळमळूं नये म्हणून दहींभात, हिंग, सुंठ, मिरपूड अन् लिंबू या वस्तू आवर्जून तिच्या गांठोड्यांत बांधल्या.

नगरांत पार्वतीच्या अनेक सख्या होत्या. पार्वती निघाली हें समजतांच त्यांचा जीव गलबलला. त्या धांवतच तिच्याजवळ आल्या. डोळ्यांना पदर लावून त्यांनीं म्हटलें, 'उमा! आतां कधीं येशील?'

**कधीं येशी मायेबहिणी**
**जीवींचे ग सांगातिणी**
**भावोजीला ग पुसुनि**
**असेंच यावें माहेरा**

सख्यांची जर ही अवस्था तर माउलीचें काय झालें असेल! तिच्या 'बांधल्या तळ्याचा' पाट फुटला. तिनें पार्वतीला पोटाशीं धरलें. आंसवांच्या

मोत्यांनीं तिचा भांग भरला. किती तरी वेळां तिच्या गालावर ओंठ टेंकले. मायलेकींनीं पाझरत्या डोळ्यांनीं एकमेकींकडे पाहिलें. बोलाबुद्धीला अटक असलेले अनेक आशय त्या दृष्टींतून एकमेकींच्या हृदयांत पोंचले. आईनें स्वहस्तें मुलीला नंदीवर बसवलें. नंदी पुढें चालला; पण पार्वतीची दृष्टि मागेंच राहिली. बाप एवढा धीराचा; पण तोहि डळमळला.

**राव म्हणे ग सुखी राहे**
**चित्त आहे तुजपाशीं**

किती संजीवक आश्वासन! मुलीला आणखी काय हवें? परक्या घरीं नांदायला जाणारी मुलगी, आपल्या माहेराकडून मुख्यतः हेंच इच्छीत असते.

आपल्या महाराष्ट्रांत चैत्रगौर बसवतात, ती देव्हाऱ्यांत न बसवतां दोल्हाऱ्यावर बसवतात. तिची महिनाभर नित्य पूजा चालते. एक दिवस सवाष्ण जेवायला वाढतात. सोईच्या वारीं एक दिवस मोठें हळदीकुंकू करतात. त्या दिवशीं गौरीची आरास शोभवतात. पक्कान्नाच्या परवडी अन् नानाप्रकारचे खेळ गौरीपुढें मांडतात. अशाच एका चैत्रांतल्या हळदी-कुंकवाच्या प्रसंगीं गौरीपुढें बसून एका वृद्ध पुरंध्रीनें हें गाणें म्हणतांना मी ऐकलें आहे. चैत्रांतला हा सर्व सोहळा गौरीच्या माहेरवासाचें प्रतीक आहे.

---

## गौरीचें माहेर

गौर पुसे शंकरासी। स्वामी विनंती परियेसीं
मज पाठवा माहेरासी। भेटुनि येईं स्वामिया १

शंकर म्हणे प्राणवल्लभे। तुजविण आम्हां केवीं गमे
तूं गेलिया रंगसभे। येथें काय शोभेल? २

स्वामी सर्वज्ञ असती। तिथें दास किंकर किती
मनिंचे मनोरथ पुरती। कृपा केल्या शंकरें ३

आम्हा स्त्रियांच्या हो जाती। सासुऱ्यांची आति संपात्ति
तरी माहेरिंची प्रीति। मायबापा भेटावें ४
मज तों आहे तुमचें ध्यान। त्यानें चाले हें जीवन
परी येईन भेटुन। शीघ्र हो स्वामिया ५
सकळहि दळभार सिद्ध झाला। नंदी वेगें पालाणिला
सवें सखियांचा मेळा। नमस्कार केला देवासी ६
मग ती चालिन्नली कैसी। सव्य घालुनी शंकरासी
रहा रहा म्हणते नगलोकांसी। जे जे येती बळिवीर ७
कैलासाहुनी निघाली। शीघ्र पर्वतपुरा आली
वाद्यध्वनि चालिन्नली। नगरलोकीं ऐकिली ८
धांवुनि येती ते सेवक। नगरींचे रक्षणपालक
राया सांगती कौतुक। गौर आली भेटीसी ९
हर्षे तोषें निघाले राव। निशाणासी दिला घाव
महाद्वारीं आले पाहों। तों देखिली अंबिका १०
उतरली नंदीवरून। बाप्पा दिलें आलिंगन
त्यानें निवालेंसें मन। परस्पर उभयतां ११
काय हें सुवर्ण घरासि आलें। केवढें निधान सांपडलें
आळश्या गंगोदक आलें। घरामाजी तयांच्या १२
ऐशी परी आम्हा झाली। आपणहुनी भेटिस आली
सिद्धी कोणा आकळली। कृपा केली शंकरें १३
हर्ष झाला बहु मातेसी। आंग धुवुनी निघाली स्वैंपाकासी
अग्नी घालुनी चुलीसी। नाना पाक आरंभिले १४

माय म्हणे ग भुकेली । वेगें करा हो आंघोळी
मग ताटें विस्तारिलीं । षड्रस पक्वान्नें १५
शाका वाढिल्या कुसरी । कोशिंबिरी नानापरी
आलें, लिंबू, हो लोणचीं । पक्वान्नें बहुत १६
खिरी वाढिल्या सकळा । साखरमांडे नि गुरोळ्या
तुपें तळिल्या खिरघाऱ्या । सद्योघृत वाढिलें १७
अन्न वाढिलें सोज्वळ । वरी वरण निर्मळ
कथिकेचा अति परिमळ । अंबावडा वाढिला १८
हस्तप्रक्षाळण झालें । मुखीं तांबूल शोभले
दोल्हाऱ्यावर आसन केलें । शोभा सांडे तेथूनी १९
शोभा शोभवी आपण । सहस्रफणी हेमवर्ण
प्रभा प्रकाशली पूर्ण । सदाकाशीं निर्मळ २०
इंद्रनीळ माणिक प्रभा । मुक्तें जडियेल्या स्तंभा
अलौकिक दिसे शोभा । वैजयंती गोमेद २१
मुखीं चारा ग विसरती । बहुविध पक्षिजाती
तया सौंदर्या भुलती । हिये वनीं रहिवास २२
ऐसा एक मास झाला । तेव्हां गणेश मूळ आला
त्यासी आदर मान केला । आणि एक पाहुणेर तयासी २३
अनेक परवडी करीती । मोदक लाडवांची प्रीति
साखर शेवया वाढिती । पक्वान्नें बहुत २४
भोजन करी सावकाश । जें जें रुचेल तुम्हांस
उदका कापुराचा वास । प्राशन करा उपरी २५

भोजन करुनी उठिले । उष्ण उदकें आंचवले
कापुरासहित विडे ओपिले । मग बैसले महासभे २६
तया आदर, मान करिती । वस्त्रें, अलंकार देती
मग पुसती गौरीप्रती । ऐसेंची यावें माहेरा २७
दह्याभाताची शिदोरी । हिंग, सुंठ, मिरपुडी
आलें, लिंबू, हो लोणचीं । पक्वान्नें बहुत २८
ऐशा दुरड्या ज्या भरिल्या । सवें सखिया निघाल्या
आंबेवनीं ज्या पातल्या । मग सारिलीं भोजनें २९
कधीं येशी मायेबहिणी । जीवींचे ग सांगातिणी
भावोजिला ग पूसुनी । असेंच यावें माहेरा ३०
मायेनें पोटाशीं धरिली । आलिंगून चुंबियेली
नंदीवरी बैसविली । सुखें जाई कैलासा ३१
अंबा परतोनी पाहे । सद्गदित कंठ होये
राव म्हणे ग सुखी राहे । चित्त आहे तुजपाशीं ३२
गणेशासहित निघाली । शीघ्रें कैलासा पातली
शिवशंकरें देखियेली । हास्यवदन तियेसी ३३
गौरी करी नमस्कार । आनंद झाला असे थोर
अनंत गोपाळें माहेर । सुखें आहे संसारीं ३४

---

# भिल्लीण

## [ कथासूत्र आणि रसास्वाद ]

शंकर आणि पार्वती. तो देवांचाहि देव महादेव तर ती साक्षात् ब्रह्मविद्या. महेश्वर 'भोळा शंभु' तर पार्वती कलाचतुर आदिमाया. दोघाचे स्वभाव भिन्न; पण दोघांचीहि लग्नगांठ पडलेली. 'अर्धनारीनटेश्वर' या रूपानें शिव-पार्वतीचें अद्वैत झालें खरें; पण उभयतांनीं अद्वैतांतच द्वैताचा आभास निर्माण करून 'मी वल्लभा आणि तूं कांत' अशा नात्याचें स्वादिष्ट सुख अनुभवलें.

प्रेम हा दांपत्यजीवनाचा स्थायीभाव. पण रुसवा, अबोला, लटकें भांडण, लटका रागाचा आविर्भाव, खोंचदार अन्योक्ति, ओढून ताणून चंद्रबळ, हुलकावणी, समजावणी अशा विविध रंगछटांनीं त्या प्रेमाचा उत्कर्ष करावा लागतो. संसारांतहि एक प्रकारचा 'विरोधविकासवाद' आहेच. रुचि न बिघडूं देतां, वीट न येऊं देतां, 'नित्य नवें' करून तें चाखलें पाहिजे. वार्धक्य आलें, शरीरें सुरकुतलीं, तरी प्रेमाचा रस आटतां कामां नये, असें भवभूति सांगतो. शिव-पार्वतींनीं जो अनुराग भोगला तो अशा प्रकारचा होता.

प्रत्येक वेळीं बहुधा पार्वतीनेंच 'मुळारंभ' करायचा. शिव संध्येचें उपस्थान करायला हात जोडून उभा राहिला कीं पार्वतीनें हळूच त्याला डिंवचायचें.

"कां हो ? कुणाचं ध्यान चाललं आहे डोळे मिटून ? "

"आता या समोर रंग उधळणाऱ्या संध्येचं अन् इतर वेळीं तुझं."

"मला फसवतां होय ? दुसरी कोण तरी तुमच्या मनांत भरलेली दिसते. ती प्रत्यक्ष भेटत नाहीं म्हणून तुम्ही संध्येच्या मिषानं तिच्या काल्पनिक सहवासांत तरंगतां."

"छेः छेः उमा ! हें काय भलतंच बोलणं ? "

"मी पुरती ओळखतें तुम्हांला. उगीच नाहीं बोलत. समुद्रमंथनप्रसंगीं लक्ष्मी वर निघाली आणि तिनं तुम्हाला सोडून श्रीहरीला वरलं म्हणून तुम्ही

विष प्यालांत. मला ठाऊक आहे तुमचा ' लंपट ' स्वभाव. मुळींच बोलूं नका माझ्याशीं."

एखादे वेळीं पार्वती कसली तरी वस्तु हातांत घेऊन लपवल्यासारखी करायची. शंकरानें म्हणायचें, 'तें काय लपवलेंस?' पार्वती उत्तर करायची, 'कुठें काय ? तुम्हांला उगाच संशय येत असतो.' शिवानें त्यावर म्हणायचें, 'तूं बऱ्या बोलानं दाखव काय तें.' पार्वती पळत सुटायची. शंकर मागें लागायचा. तिला पकडून तिच्या हाताशीं झोंबाझोंबी करायचा. त्यांत तिची बांगडी वाढवायची. आणि जमिनीवर पडलेलें तें अर्धकंकण चुक्चुक् करीत पार्वती उचलूं लागली कीं शंकरानें तिच्याशीं भांडण उकरून काढायचें. 'माझ्या जटाजुटांतली चंद्रकोर निखळून पडली ती तूं उचललीस. दे आर्धी माझी.'

आणि मग रागानें धुसफुसत शंकरानें तोंड फिरवलें कीं पार्वतीनें मागच्या मागें त्याच्या मस्तकींची चंद्रकोर अलगद काढून घ्यायची. आपली अर्धी बांगडी अन् ती चंद्रकोर यांचीं टोंकें मिळवून त्यांचें पूर्ण वर्तुळ बनवायचें. त्याचा अप्रकाशित भाग आपल्या हास्यप्रभेनें धवलित करायचा अन् शंकरापुढें जाऊन म्हणायचें 'चंद्रकोरच कशाला ? हा घ्या पूर्ण चंद्र. तुमचं घेतलं होतं, तें दामदुप्पट परत केलं. आतां तरी राग शमेल का स्वारीचा ?'

कधीं कधीं पार्वती अष्टौभावें उचंबळून शंकराजवळ येऊन बसे. पण नवोढा वधूची रीतच वेगळी असते. 'नवाङ्गनानां नव एव पन्थाः।' ती काय आपले हृदयभाव उलगडून पुढें मांडील ! पति शहाणा असला तर त्यानें ते आकारावरून जाणून घ्यावे. शंकर तिची ती भावविवशता जाणून पण मुद्दाम वेड पांघरून तिला विचारी. 'उमा, तुझ्या कपाळीं घर्मबिंदु कां उगवले? ही सोन्याची वेल मोत्यांच्या घोसांनीं कां डंवरली ?' त्यावर उमा उत्तर करी, 'तुमच्या तिसऱ्या डोळ्यांतली धग सोसवत नाहीं मला.' शंकर पुन्हा विचारी, 'तर मग हा सूक्ष्म कंप कां ?' पार्वती सांगे, 'तुमच्या गळ्यांतल्या भुजंगाची भीति वाटते म्हणून.' शंकर तिसऱ्यांदां प्रश्न करी, 'अन् तुझ्या कायेवर रोमांच फुलले आहेत ते कां ?' पार्वतीचें त्यावरहि उत्तर तयार असे, 'गंगेच्या शीतल तुषारांमुळें.' आणि अशीं हीं त्यांचीं प्रश्नोत्तरें उभयताच्या अंतरांत सुखाची परमावधि करीत.

त्यांना सारीपाट खेळायचाहि छंद असे अन् तोसुद्धां अळणी नव्हे; तर पण लावून. त्याची अखेरहि ठरलेली असायची. तो हरायचा अन् तिनें जिंकायचें. दोघांनाहि नेमकें दान पडे; पण पार्वतीला जें हवें असेल तें अन् शंकराला जें नको असेल तें. त्यामुळें पार्वतीनें एकेक वस्तु त्याच्या अंगावरून उतरून घ्यायाची अन् शंकर पुरता कफल्लक बनायचा.

कामाच्या पाठोपाठ क्रोध तसा द्यूतामागोमाग कलह ठेवलेलाच असतो. हार यायला लागली कीं रुद्र चिडायचा अन् मग दोघांची शब्दाशब्दी व्हायची. पुष्कळ वेळां तें प्रकरण थोडक्यांत निभावे, पण त्या दिवशीं मात्र शंकराचा क्रोध अनावर झाला. तिनेंहि नमतें घ्यायचें तें घेतलें नाहीं. अखेर 'इतःपर तुझा संबंध नको' म्हणून शंकर कैलासाहून चालता झाला.

पार्वतीला वाटलें कीं, 'बसतील एखाद्या घळींत थोडा वेळ अन् कंटाळा आला कीं आपसुक परत येतील.' पण त्या दिवशीं तिचा अंदाज चुकला. बराच वेळ झाला तरी तो परत आला नाहीं. पार्वतीनें आपली काचोळी 'उफराटी' करून अंगांत घातली. पण बायकी उपायालाहि यश आलें नाहीं. धन्याच्या अभावीं कैलास काळवंडला. शिवगण हिंपुटी झाले. नंदीला आपल्या अंगांतलें बळ गेल्यासारखें वाटलें. वातावरणांतला खेळता उत्साह ओसरला. पार्वतीचें चित्त उदास झालें. 'एकलेपणाची आग' तिच्या हृदयाला जाळूं लागली.

ती त्याच्या शोधासाठीं निघाली. त्याला साद घालीत दऱ्याखोऱ्यांतून हिंडूं लागली. पण तिच्याच प्रतिध्वनीवांचून दुसरा शब्द तिला ऐकूं येईना. वेलींनीं हात हालवलेले अन् वृक्षांनीं माना डोलवलेल्या पाहिल्या कीं त्या बाजूला आपला सौभाग्यसूर्य लपला असेल म्हणून पार्वती तिकडे धांवायची. हरिणी नेत्र विस्फारून उभ्या असलेल्या दिसल्या कीं तिला वाटायचें त्यांच्या बाजूला असतील. एखाद्या पांखरानें शीळ घातली कीं 'इकडे ये, हा पहा इथें बसला आहे तुझा प्राणविसांवा' असेंच जणुं तें आपल्याला सुचवीत आहे अशी तिची समजूत व्हायची. अशा प्रकारें फिरून फिरून त्या 'गोरटी'च्या पायाची चाळण झाली आणि अखेरीस डोळे तिला म्हणाले— 'तो पहा!'

दूर अंतरावर शंकर एका शिलातलावर बसला होता. एका महान् वृक्षानें

त्याच्यावर छाया केली होती. त्यानें पद्मासन घातलें होतें अन् दोन्ही करतलांचीं कमळें करून मांड्यांवर ठेवलीं होतीं. दृष्टि नासाग्रीं स्थिर करून ध्यान धरलें होतें. जसा निर्वातीचा निष्कंप दीप! आत्मरूपाशीं तो अखंड, एक-रस झाला होता. आत्मज्योत पाजळली होती अन् जगदाकार धवळला होता. तिथें कुठलें जग, कुठला कैलास अन् कुठली पार्वती! 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हाच तिथला निर्मळ निजानंद!

पार्वतीनें शंकराची ही सहजस्थिति जाणली. तिला आतां त्याला भानावर आणायचें होतें. आपला कान्त अन् कैलासाचा राणा बनवायचें होतें. काय करावें असा विचार मनांत येतांच तिचें चातुर्य सेवेला खडें झालें. तें तिला म्हणालें, 'पार्वती, भिल्लीण हो.' अन् मग--

## शिवासाठीं झाली भिल्लीणी । जगन्मोहिनी

भिल्लीण व्हायचें ठरतांच त्याला अनुकूल असा वेष तिच्यापुढें हजर झाला. एक राकट कांबळ ती नेसली अन् घट्ट कांचा कसला. तंग चोळीची गांठ आवळली. अंबाड्यांत रानफुलांचे तुरे तोडून माळले. भांग-टिळा ठसठशीत केला. अन् लचकत मुरडत शंकरापुढें येऊन उभी राहिली. तेंच यौवन, तीच कांति अन् तोच आंगठसा. फक्त गोऱ्या रंगाच्याऐवजीं सांवळा वर्ण प्रगटला. बोलण्या-चालण्याची नागर रीति जाऊन रांगडी धटाई आली.

शंकराला भुलवण्याचा रामबाण उपाय म्हणजे नृत्य हें तिला ठाऊक होतें. तेंच तिनें आरंभलें. उजवा पाय उचलून त्याचा भूमीवर आघात केला. त्याच क्षणीं पैंजणांचा झणत्कार उठला. नखशिखान्त, अंग थरारलें. शंकराच्या ध्यानस्थ वृत्तीवर पहिला प्रहार झाला. पावलांनीं विशिष्ट लय धरली. हात अन् बोटें वेगवेगळ्या मुद्रा दाखवूं लागलीं. काया वेतासारखी लवूं लागली. डोळे भावनांचे रंग उधळूं लागले. मुखमुद्रा झरझर पालटूं लागल्या. क्षणांत आवेश, क्षणांत कारुण्य, क्षणांत अनुराग, तर क्षणात कठोरता.

आदिमाया जगदंबेचेंच नृत्य तें! तें पाहून स्थिरचर भुललें. शंकरहि डोळे उघडून पाहूं लागला. त्याच्या हृदयाच्या सर्व पाकळ्या उमलल्या. त्याला वाटलें किती साधी भोळी; पण किती कलावती मुलगी आहे ही! तो तिच्याजवळ उठून जातांना विचार करूं लागला, 'हिच्याशीं लग्न करून नवा

संसार थाटावा. पार्वतीला चांगली अद्दल घडूं दे! मोठी मिजासखोर आहे ती!' त्यानें भिल्लिणीशीं तसा प्रस्ताव करतांच ती त्याला म्हणाली.

"तुमच्याशीं लग्न—?"

"काय हरकत आहे? मी तुला सुख देईन. कैलासाची स्वामिनी करीन. माझ्या सर्व गणांना तुझ्या सेवेला लावीन."

भिल्लीण फणकाऱ्यानें मागें सरकली अन् दुरून शंकरावर कटाक्षबाण मारूं लागली. शंकर आणखी जवळ गेला. तिनें आणखी एकदां विजेची चपळाई दाखवली. शंकरानें पुनश्च तिचा मागोवा घेतला.

"नका माझ्याशीं लाडीगोडी लावूं.

**एकीचा हो तुम्हीं शेवट लाविला नीट**

त्या पार्वतीचा शेवट तुम्हीं कसा लावलात तें मला चागलं ठाऊक आहे. ती बिचारी रडते तुमच्या नांवानं अन् तुम्ही इथें माझ्याशीं लगट करतां. उद्यां माझीहि तीच गत कराल. चला दूर व्हा. मला तुमचा वारासुद्धा नको."

"भिल्लकन्ये! कां असं निखंदून बोलतेस? मीं पार्वतीचा त्याग केला यांत तिचाच अपराध मोठा आहे. फार घमेंडखोर आहे ती. मला आपलं खेळणं बनवूं पाहते. पण तूं तशी नाहींस. किती निरागस मोकळं मन तुझं! मी भोळा तशी तूं पण भोळी! चल ये. माझं अर्धांग शोभव अन् धन्य हो!"

कैलासराणा प्रेमाचा भिकारी बनून तिला गळ घालूं लागला. पण ती राजी होईना. तो जेव्हां मागें लागला तेव्हां तिनें निक्षून सांगितलें.

"मी परवधू आहें. माझा पति तमोगुणाचा पुतळा आहे. माझ्या वाटेला गेलांत तर वणव्यासारखा त्याचा राग भडकेल. मी तुम्हांला पचायची नाहीं बरं!"

"पाहतोंच तर कशी पचत नाहींस तें!"

असें म्हणून शंकरानें तिचें मनगट पकडलें. भिल्लीण प्रतिकार करायच्या-ऐवजीं खदखदून हंसूं लागली. ती अशी कां हंसते म्हणून शंकर तिच्या डोळ्याला डोळा भिडवतो तों भिल्लिणीच्या जागीं पार्वती. शिव आश्चर्यचकित झाला अन् लाजलाहि.

" चांगले धंदे करतां इकडे येऊन ! " पार्वतीनें शिवाच्या मर्मावर प्रहार केला. शंकरानें पण समयोचित उत्तर दिलें.

" वेताची छडी वांकली कीं तिला सरळ करण्यासाठीं दुसऱ्या बाजूनें तितकीच वांकवावी लागते, समजलं ? "

कलह संपला. हृदयावरचीं अभ्रपटलें उडालीं. आत्मे विशद झाले. आणि मग—

" तुका म्हणे गंगासागरसंगमीं
अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ! "

---

## भिल्लीण

शिवासाठीं झाली भिल्लीणी जगन्मोहिनी
गिरिजा झाली उदास
केंव्हां माझा शंभु भेटेल
श्रम फिटेल ध्रु०
वस्त्र हें नेशिली घोंगडा माथां बुचडा
चोळी ल्यायिली उपराठी
सोगेयाचें घालुनि अंजन दिव्य भूषण
भांग टिळा ललाटीं
चालतां मार्गें ही चमकली शिवें देखिली
कोण आहे गोरटी
ही स्त्री जरी आम्हां भेटेल, भाग्य लोटेल १
आम्हीं एकटेचि हे वनीं होई कामिनी
तुझा छंद लागला

ऋद्धि-सिद्धी दासी करीन, सेवे आणीन
मान देई या बोला
येऊनी धरिली पदरीं जाऊं मंदिरीं
मग पावसी सुखा
कितीतरी तुज समजेना कांहीं उमजेना
कृपा, लोभ नेणसी
मी कोण आहें ग नेणसी महातापसी
मग रुसोनि जाये २
एकीचा हो तुम्हीं शेवट लाविला नीट
बोलूं नका वचनें
परवधू आहें मी पतिव्रता भिल्लाची कांता
माझा पति तो आहे रागीट महा तामस
वेडे झाले धूर्जटी
खदखदां गिरिजा हंसते रूप दाविते
शिव लज्जित झाले
भिल्लिणीचें सोंग घेऊनी आम्हां फसवूनी
कैसें विपरीत झालें
पार्वतीनें करीं धरीला सखा आपुला
विश्वरामाचे ठेवे ३

---

# कोकिळा

## [ कथासूत्र आणि परिचय ]

नारीजातीला विश्वमोलाची वस्तु म्हणजे सौभाग्य. तें 'इहजन्मीं' नव्हे तर 'जन्मांतरीं'हि अखंड लाभावें म्हणून त्या अनेक देवतांची पदर पसरून प्रार्थना करतात. त्यांचीं पूजा-व्रतें चालवतात. स्त्रियांच्या या आराध्य देवतांत सती पार्वतीला अग्रपूजेचा मान आहे. सती ही त्यांना पूजनीय तशीच अनुकरणीयहि वाटते. इच्छित पति मिळावा म्हणून घरांतून पळून जाऊन कायक्लेशांचें तप आचरणारी म्हणून ती त्यांना प्रिय आहे. 'भोगावर पाषाण' घालून स्मशानवासी शंकराची परिचर्या करणारी म्हणून ती त्यांना वंद्य आहे. आणि अनेक दुष्ट राक्षसांचा संहार करून स्त्रीत्वाच्या ठिकाणीं वीररसाचा परम उत्कर्ष दाखवणारी अन् 'भक्तानां अभयंकरी' म्हणून ती त्यांना शरण्य आहे.

वसंत ऋतूंत चैत्रगौर म्हणून बायका तिचे 'दोल्हारे' सजवतात. श्रावणांत मंगळागौरीच्या रूपानें तिला आवाहन करतात. भाद्रपदांत ज्येष्ठागौर म्हणून तिला घरीं आणतात. हरितालिका म्हणजे सखी आणि पार्वती. त्या दिवशीं बायका कडकडीत उपवास करतात; इतकेंच नव्हे, तर अग्नीला लागलेलें कांहीं खात नाहींत. ललिता, शीतला, काली, दुर्गा, इ. रूपांनीं तिचीच पूजा होते. शुक्रवार तर खास तिचाच. आणि इतक्या विविध रूपांच्या उपासनेनेंहि तृप्ति होत नाहीं म्हणूनच कीं काय, कित्येक स्त्रिया कोकिळेच्या रूपानेंहि तिला भजतात.

कोकिळा ही कविजनांची लाडकी आहे. तिच्या पंचमालापावर ते जीव ओवाळून टाकायला निघतात. तिच्या आम्रमंजरीच्या आस्वादनाचें कौतुक करतांना त्यांच्या वाणीची धणी पुरतां पुरत नाहीं. कालिदास तिच्या कूजनाला मानिनीचा रुसवा घालवणारें 'स्मरवचन' म्हणतो. जयदेव वृन्दावनांत जाऊन तिची 'कलोत्ताल गिरा' ऐकतो. पू. विनोबांसारखे तत्त्वदर्शीसुद्धां तिचें कोडकौतुक करायला विसरले नाहींत. 'कोकिळा किती

सुंदर ध्वनि काढते, जणुं उपनिषद्च गाते' हे त्यांचे उद्गार. कविराणा वर्ड्स्वर्थ तर तिच्यासाठीं वेडाच बनला आहे.

"O cuckoo ! shall I call thee bird,
Or but a wandering voice ?"

तात्पर्य, कोकिळेचें नामग्रहण न करील तो कवि कसला, असा एक अलिखित संकेतच ठरून गेला आहे. स्त्रियांना काव्यरसाचें वावडें असतें असें नाहीं. त्या रस तर चाखतातच; पण शिवाय त्यांतून कांहीं प्रेरणाहि घेतात. काव्यानंदाला पोषक असा कांहीं नेमधर्महि उभारतात. त्यांनीं कोकिळेला सतीचें प्रतीक कसें मानलें आणि तिचें 'कोकिळाव्रत' कसें निर्माण केलें त्यासंबंधीं कथा आणि विधान पुढीलप्रमाणें:—

दक्ष प्रजापतीनें आपल्या अनेक कन्यांपैकीं सती ही शंकराला दिली. पुढें एका प्रसंगीं शंकरानें त्याला योग्य तो मान न दिल्याबद्दल दक्ष चिडला. सासऱ्या-जांवयांचें वितुष्ट आलें. ब्रह्मदेवानें जेव्हां सर्व प्रजापतींचा अधिपति म्हणून दक्षाला अभिषेक केला तेव्हां त्यानें 'बृहस्पतिसव' नांवाचा मोठा यज्ञ आरंभला. त्या यज्ञांत शंकराला वगळलें गेलें. देव आपल्या शृंगारलेल्या स्त्रियांसह विमानांतून दक्षाच्या यज्ञमंडपाकडे निघालेले जेव्हां सतीनें पाहिलें, तेव्हां तिला चुटपुट लागली. 'आपल्या माहेरीं केवढा आनंदोत्सव मांडला असेल अन् आपण मात्र इथें ! कां बरें वडिलांनीं आम्हांला बोलावलें नाहीं ! कदाचित् गडबडींत विसरले असतील. मग आपण न बोलावतांच कां जाऊं नये ! बापाच्या घरीं जायला असले व्यावहारिक संकेत कां म्हणून आडवे यावे !'

तिनें शंकराकडे अनुज्ञा मागितली. शंकरानें तिला सगळा बनाव समजावून सांगितला. पण तिचा विश्वास बसेना. ती हट्टानें जायला निघाली. शंकर म्हणाला, 'जाणारच असलीस, तर निदान गणांना तरी बरोबर घेऊन जा.'

ती यज्ञमंडपांत आली तरी कोणी तिची दखल घेईना. दक्षानें यज्ञकर्मांत गढून गेल्याचें दाखवलें. तिला अपमानाचें शल्य बोंचलें अन् शंकराला यज्ञांत हविर्भाग नाहीं, हें पाहून तर तिच्या भुवया चढल्याच. तिनें बापाला जाब विचारला. त्याचें उत्तर म्हणून तिला साग्रसंगीत शिवनिंदा ऐकावी लागली. ती दक्षाला म्हणाली, "तुमच्या पोटीं जन्म घेतला याची मला लाज वाटते.

हा देह पापरूप आहे असें मी समजतें. मी आतां त्याचा त्याग करून तुमच्या नात्यागोत्यांतून मोकळी होणार आहें."

सती म्हणजे महायोगिनी. तिनें सिद्धासन घातलें अन् हृदयांत योगाग्नि चेतवला. क्षणांत ज्वाळा उठल्या अन् त्यांनीं सतीच्या देहाचा कवळ केला. भस्म तेवढें खालीं उरलें !

संहारकर्त्या रुद्राचा क्रोध खवळला. त्यानें जटा आपटून वीरभद्र निर्माण केला. शिवगणांसह तो यज्ञाकडे धांवला. त्यांनीं यज्ञाची वाताहात केली. भृगूच्या मिशा उपटल्या. भगाचे डोळे काढले. पूषाचे दांत पाडले. अन् शेवटीं दक्षाचेंहि शिर तोडलें.

पाठोपाठ शंकराची स्वारी तिथें दाखल झाली. भ्यालेल्या ऋषींनीं अन् ऋत्विजांनीं त्याचे पाय धरले. 'रक्ष रक्ष' म्हटलें. शंकर खवळला तसाच निवळला. त्यानें मग पशूचें मस्तक दक्षाच्या धडाला जोडून त्याला जिवंत केलें. गुर्मीत असणारा सासरा मऊ आला. त्यानें शंकराजवळ क्षमायाचना केली.

शंकरानें मग सतीच्या भस्माकडे पाहिलें अन् म्हटलें. 'मी नको म्हणत असतां तूं आलीस अन् यज्ञाच्या विध्वंसाला कारणीभूत झालीस. तुला पुढचा जन्म पाखराचा मिळेल.' अन् काय आश्चर्य ! त्या राखेंतून एक कोकिळा उडून जवळच्या आम्रवृक्षावर बसली. शंकर तिच्याकडे पाहतच राहिला. शंकराला तिचा वियोग कुठला सहन व्हायला ! तोहि कोकिळ बनून तिच्या शेजारीं जाऊन बसला.

अन् त्या वेळेपासून या अलौकिक कोकिळेचें व्रत स्त्रियांनीं सुरू केलें. आषाढाच्या पुनवेपासून तों श्रावणी पौर्णिमेपर्यंत त्या व्रताचा कालावधि. पिवळा वेष परिधान करायचा. पिवळीं फुलें अन् पिवळ्याच अक्षता पूजेला घ्यायच्या. कां तर देहत्याग करतांना सतीचें वस्त्र पिवळें होतें. चण्याची डाळ पिवळी असते म्हणून तिचाच नैवेद्य करायचा.

या व्रतांतला विशेष नियम असा कीं, प्रदोषकाळीं भोजन करायचें अन् तेंहि कोकिळेचा 'कुहू' शब्द ऐकून. दैववशात् तो जर कानीं पडला नाहीं तर हातातोंडाची गांठ नाहीं. अन् असे किती दिवस कोरडे जातील तें कोण सांगणार ! सगळें तिच्या लहरीवर अवलंबून. एखादे वेळीं अचानक ती जवळच्या झाडावर पर्णसंभारांतून डोकावते अन् आशेनें कान-डोळे तिकडे

लावावे तों तोंड न उघडतां पलीकडच्या कुठल्या तरी वृक्षावर भुरदिशीं पसार होते. ती जणुं व्रती स्त्रीला सुचवते, 'मी तुझ्या लहरीनें गाईन होय! जरा ये कीं, माझ्या मागून. थोडी चाल. थोडी पळ. या बाजूला रान कसं पावसानं पुष्ट झालं आहे बघ. त्या बाजूला शेतं कशीं डौलांत डुलतात तीं पहा. निसर्गाचं दर्शन घडेल. पुरेसा व्यायामहि होईल. अन् मग जेवशील तें अन्नहि रुचेल अन् पचेल. मी कांहीं तुला निराश करणार नाहीं. मला तरी आलाप घेतल्यावांचून स्वस्थ कुठें बसवतं? " I sing, because I must."

असें आहे हें काव्यमय व्रत. सक्तीनें निसर्गाकडे नेणारें. सक्तीनें मोकळ्या वातावरणांत हिंडवणारें. तें पुरें झाल्यावर मग दांपत्यभोजन घालून त्याचें उद्यापन करायचें अन् गौरी-शंकराला प्रार्थून म्हणायचें, "मला अक्षय चुडे दे. 'संतत, संपत' दे, आणि सगळं मंगल कर!"

---

## कोकिळा

प्रथम वंदूं मोरयाला ज्ञान देई कवितेला
गाईन गिरजा-शंकराला
ऐका कथा-विस्तार १

दक्ष ब्रह्मयाचा सुत पाहूं आला विश्वनाथ
सभा बैसली समस्त
कैलासाशीं देवांची २

शिव बैसले सिंहासनीं सवें उभी दाक्षायणी
दक्ष संतोषला मनीं
सभेमाजी बैसली ३

देवें बहुमान केला शिव बैसोनि राहिला
देखुनि दक्षा कोप आला
निंदा करी शिवाची ४

म्हणे 'कन्या दिधली याला हा तर मानीना मजला'
जाउनि पर्वतीं बैसला
लिंगमूर्ति शंकर ५

व्याघ्रांबर परिधान गजचर्म पांघरूण
अंगीं सर्पाचें भूषण
चंद्रकोर ललाटीं ६

चंद्र, सूर्य, अग्नि तीन नेत्र दिसती दारुण
हातीं पिनाक आणि बाण
विषें झाला नीळकंठ ७

अंगीं लावूनि विभूति टंकशूल दोन्ही हातीं
नाचतसे स्मशानांतीं
शंख-डमरू वाजवी ८

हातीं घेउनी कपाळ गळां घाली रुंडमाळ
गंगा वाहे झुळझुळ
जटेमध्यें मस्तकीं ९

क्रोधचक्र घेउनि हातीं धावूं लागे दैत्यांपाठीं
म्हणे 'न पाहीं मुख दृष्टीं'
अष्टमूर्ति शंकर १०

दक्ष मंदिरीं पातला गुह्य सांगे कपिलाला
म्हणे 'बोलवा विष्णूला
यज्ञस्तंभ घालाया' ११

त्रिभुवनिं केलासे हांकारा नरनारी सुजनाला
वगळिलें एका शंकरा
यज्ञदीक्षा घेतली १२

यज्ञ नारदें पाहिला हंसूनि कैलासासीं गेला
शिवासि वृत्तान्त कथिला
उमा झाली दुश्चित १३

म्हणे ' जाइन माहेराला दक्षयज्ञ पहायाला '
देव वारीतसे तिजला,
' अपमान होईल ! ' १४

शिवासि केला नमस्कार गिरिजा चालली सत्वर
शंभु म्हणे ' विघ्न थोर
नंदी, गण नेईजे ' १५

गौर आली माहेरास कोणी न म्हणे बईस
क्रोध आला भवानीस
सभे उभी राहिली १६

म्हणे ' कोण गुरू केला शंभू नाहीं बोलाविला
शरण जाई तूं वहिला'
पित्यासवें बोलली १७

दक्षा चढलासे कोप म्हणे ' न बोलें अधिक
मी न पाहें शंभूमुख
दिगंबर जोगडा ' १८

अंबा रागें खवळली कुंडीं उडी जी घेतली
सभा भयभीत झाली
कडाडिला कैलास १९

शिवासि मात प्रगटली भूमि जटा आपटिली
विरभद्राशीं आज्ञा दिली
' यज्ञ नासुनि येईजे ' २०

वीरभद्रासी देखुनी अग्नि पळाला तेथुनी
देव-शिवगण मिळुनी
युद्ध करिती दारुण २१

पूषा दंत जे पाडिले भग नेत्र जे काढिले
दक्षमस्तक तोडिलें
अग्निकुंडीं टाकिती २२

शिव आले नंदीवरुन युद्ध करीती दारुण
देवसभा प्रार्थी जाण
सांब प्रसन्न झाले २३

पशुमस्तक तोडिलें दक्षधडाशीं योजिलें
देवसभेनें प्रार्थिलें
सांब झाले प्रसन्न २४

'देवी ! यज्ञ तूं नाशिला पक्षीजन्म येइल तुला'
शिवशब्द ऐकीयला
नंदनवना चालली २५

गौरी जाहली कोकिळा नीलवर्ण पृष्ठ गळा
शिव पाहतसे भोळा
आपण झाला कोकिळ २६

वृक्ष लाविला रसाळ वरती कोकिळा कोकिळ
नारी व्रत आचरिती सकळ
भक्तीभावें तयांचें २७

पाद्यअर्घ्य आचमन मधुपर्क फळें नाना
तैल सुगंधी लावून
गौरी शंभु न्हाणीती २८

परिधान श्वेतवस्त्र यज्ञसूत्र अलंकार
चांफा बेल पुष्पहार
हळदीकुंकूं चंदन २९

पिवळीं फुलें पिवळा वेष पिवळ्या अक्षता पूजेस
तिळ लाडू दूध तूप
पिवळी डाळ चण्याची ३०

फलतांबूल दक्षिणा नमस्कार प्रदक्षिणा
दुर्वा गुलाल अर्पण
मंत्रपुष्पा केतक ३१

आषाढी पौर्णिमेपासून नित्य कोकिळापूजन
शिव-शक्ति-आराधन
श्रावण पुनवेंपर्यंत ३२

नेम करावा, श्रावण-पौर्णिमेसी उद्यापन
ब्राह्मणदंपत्यभोजन
शिवभवानी रूपें ३३

ऐसें व्रत ज्या करिती त्या अक्षयचूडे पावती
संतत-संपत लाहती
निश्चयेंसी शिवशब्द ३४

---

# फुलांचें भांडण

[ रसपरिचय ]

या गाण्याचीं आठ कडवीं आहेत. तुम्ही समग्र वाचाल तर तुम्हांला हें कोण्या आधुनिक कवीनें अगदीं ताजें रचलें आहे असें वाटेल. एखाद्या चित्रपटांतलें हें द्वंद्वगीत तर नव्हेना, अशीहि शंका येईल. पण पस्तीस वर्षांपूर्वी मीं हें माझ्या बालमैत्रिणींच्या तोंडून ऐकलें अन् तेंहि पुण्या-मुंबईत नव्हे; तर कोंकणांत. त्याचे स्वर अजूनहि माझ्या कानांत घुमत आहेत. 'वाद जगीं हा नच बरवा' हें पालुपद जिव्हाग्रावर घोळत आहे. हें गाणें अन्योक्तिपर आहे. घरीं, दारीं, समाजांत, जातीजातींत, 'मी मोठा तूं हलका' अशी जी फुटीर भावना आहे, त्या भावनेला यांत चार उपदेशाचे, समजावणीचे बोल आहेत. त्यासाठीं यांत फुलांचें प्रतीक घेतलेलें आहे. संवेदनशीलता हा जो काव्याचा प्रमुख गुण तो यांत सुंदरपणें प्रतिबिंबित झाला आहे. मानवांच्या अंतरांतल्या भावनांचा मानवेतर सृष्टीवर आरोप करून वर्णनांत आत्मौपम्यबुद्धि प्रकट करणें याला काव्यशास्त्राच्या भाषेंत बोलायचें तर 'समाधि' गुण म्हणतात. तो यांत ओतप्रोत भरला आहे.

भाद्रपद महिना संपत आला आहे. शरदतूनें नुकतेंच भूमीवर पाऊल ठेविलें आहे. सकाळची वेळ आहे. एका धनिकाच्या समृद्ध उद्यानांत गुलाब, शेवंती, सोनचांफा, पारिजातक, इत्यादि फुलें उमललीं आहेत. बागेची व्यवस्था राखण्यासाठीं अन् फुलें तोडून त्यांचे हार, गजरे करण्यासाठीं मालकानें एक माळीण नेमली आहे. ती रोज बागेंत यायची. फुलांना कुरवाळायची. हलुवार फुंकर घालून त्यांच्या पाकळ्या विलग करायची. सर्वांवर तिची समदृष्टि. सर्वांकडे सारखेंच लक्ष. पण एके दिवशीं ती सकाळीं नित्याप्रमाणें बागेंत येते तर फुलें आपलीं कडाक्यानें भांडताहेत ! एकमेकांचीं उणींदुणीं काढून हिणवताहेत.

पहिल्याप्रथम कुरापत काढली ती गुलाबानें. 'मी फुलांचा राजा' अशी त्याला घमेंड होती. त्यामुळें कुंडींतल्या ठेंगण्याठुसक्या झाडाच्या एका

फांदीवर तो ताठ उभा राहिला होता. इतक्यांत आली वाऱ्याची झुळूक. जवळच्या ताटव्यांवरून खालीं झेंपावणाऱ्या वेली, वाऱ्यामुळें त्याच्याजवळ आल्या. त्यामुळें त्यांच्यावरचीं फुलें गुलाबाच्या अंगाला घसटलीं. त्यांची ही घटाई राजाला कशी खपावी ! त्यानें अंग झाडल्यासारखें केलें अन् त्यांना दटाविलें, 'अशी अमर्यादा करायला लाज नाहीं वाटत ? दूर व्हा दूर !'

मी सर्व फुलांचा राजा
किति रंग सुंदर माझा
असा सुगंध कवणा दूजा
मला कशाला परवा तुमची दूरचि व्हारे दूरचि व्हा !

जवळच एका वाफ्यांत होती शेवंती. गुलाबाची ही दर्पोक्ति ऐकून तिच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. तिनें त्याला खरमरीत शब्दांत सुनविलें. " कांटेरी झुडपावर उगवलेला राकट बाप्या तूं ! तूं का फुलांचा राजा ? अहाहा ! दिवे ओवाळा. फुलांना मुळीं राजा नाहींच. तीं राणीच्या साम्राज्यांत नांदतात. अन् ती मूर्धाभिषिक्त राणी म्हणजे ही शेवंती ! तुझा धीटपणा मात्र खूप आहे बरं का.

धीटपणा हा काय गुलाबा ! लपव पाकळ्या आंत कशा

पहा माझ्या पाकळ्या ! किती बारीक पण टोंकदार. किती सतेज, सुकुमार ! आणि वासाबद्दल तर काय बोलावं ! रसिकांना मला नाकाजवळून दूर करवत नाहीं. रंग, म्हटलं तर पांढरा, म्हटलं तर पिवळा. सुंदर रमणी तर माझ्या वेणीसाठी जीव टाकतात. गुलाबराव, माझ्या सौंदर्याकडे एकवार बारकाईनें पाहाल तर राजेश्री, लाजून तुम्हांला आपल्या पाकळ्या मिटून घ्याव्याशा वाटतील. या निमित्तानं माझ्या राज्यांतल्या सर्व प्रजाजनांना मी हुकूम फर्मावितें कीं, सगळ्यांनीं मलाच मुजरे करावे."

पण शेजारीं कुंपणाजवळच्या झाडावर फुललेल्या सोनचांफ्यानें पानांच्या फटींतून डोकावून या दोघानाहि मूर्खांत काढलें.

" माझ्यावर दृष्टि गेली नाहीं म्हणून तुम्ही दोघे तोंडाला येईल तें बकतां. गुलाबा, तुझा डौल शेजारच्या कांट्याना साग, अन् शेवंतीबाई, तुम्हांला वास आहे नाहीं का ? वाटेवरच्या वाटसरूला विचारा कीं, या सगळ्या आसमंतात्

कोणाचा सुगंध दरवळला आहे? तुझं नाक कोणाच्या वासानं भरून गेलं आहे? फुलांचं राजपद मिरवणं तुमच्यासारख्या येरा गबाळांचं काम नाहीं. तिथें नुसतं सौंदर्य नाहीं चालत; सत्ता गाजविण्याचं सामर्थ्य पाहिजे. अद्वितीय वैभव पाहिजे. माझं अंग पहा. सोनं आहे नुसतं सोनं. अगदीं बावनकशी. अन् माझा आकार तर सुंदरीच्या नाकासारखा. नाकावांचून सगळं फुकट बरं! एखाद्या शेळपट शेंदाड्याला काय म्हणतात ठाऊक आहे? 'तुला नाकच नाहीं!' तेव्हां—

**तुमचा राजा मीच शोभतों अभिषेकातें मज करवा"**

माळिणीला या प्रकाराचा अचंबा वाटला. ती त्यांना थोपविण्याचा प्रयत्न करूं लागली. "अरे, आज तुम्हां सर्वांना झालं आहे तरी काय? आज तुमच्यांतली गोडीगुलाबी गेली कुठें? ·आल्या-गेलेल्यांना सुगंधाची लयलूट करायची, त्यांच्या दृष्टीला संतोष द्यायचा, त्यांचं मन प्रसन्न करायचं, तें सोडून तुम्ही अशीं वर्दळीवर कां आलांत तेंच मला समजत नाहीं. बस झालं हें भांडण."

पण भांडण्याच्या ऐन रंगांत आलेलीं फुलें माळिणीच्या दटावणीला कसलीं जुमानतात! त्यांना किती बोलूं अन् किती हिणवूं असें झालें होतें. हृदयांत दुःशब्दांचे कढ येत होते. ज्याला त्याला आपला मोठेपणा प्रस्थापित करायचा होता. एवडीशी चिमुरडी जाई ती काय; पण तीसुद्धां खोड्या काढण्यांत कमी वस्ताद नव्हती. माळणीच्या धकमावणीला भीक न घालतां नाकाला पदर लावून ती सोनचांफ्याला म्हणाली.

"शीः शीः! तूं बोलायला लागलास कीं किती भपकारा येतो तुझ्या तोंडाचा! माझा नाजूक जीव कसा गुदमरून कासावीस झाला. आणि म्हणे मी फुलांचा राजा. पानाआड लपून बसतांना जन्म गेला. भित्री भागुबाई कुठली. बाहेर तोंड काढून जरा माझी धवलकांति न्याहाळ म्हणजे गर्वाचं घर खालीं होईल. माझ्याइतका सुकुमारपणा मिळवायला तुला तुझ्या पाकळ्यांइतके जन्म घ्यावे लागतील, समजलं?"

जाई असं बोलते तों तिकडून एका आळ्यांत उभ्या असलेल्या पारिजातकाची रसवंती बोलूं लागली.

"तुम्हां लोकाना देवानं जर थोडीशी अक्कल दिली असती तर मी इथें उभा असतांना तुम्ही असे तारे तोडले नसते. द्वारकाधीशाच्या लाडक्या सत्यभामा राणीला तुमच्यापैकीं कुण्णी कुण्णीसुद्धां आवडलं नाहीं. श्रीकृष्णानं गुलाब आणून दिला तरी ती हंसेना. शेवंती दिली तरी ती खुलेना. जाईची वेणी, मधें सोनचांफा गुंफून करविली तरी तिची कळी उमलेना. शेवटीं तिला संतुष्ट करण्यासाठीं कृष्णाला स्वर्गांत जाऊन मला खालीं आणावं लागलं.

**तुमच्या एकाच्याही अंगीं मोहक गुण मुळिं नच दिसला**
**पारिजात हा म्हणुनिच देवें स्वर्गांमधुनी आणविला**
**कल्पतरूच्या अंगापासुनि**
**रक्तधवल हे दुरंग घेउनि**
**मधुर परिमला भरितों भुवनीं**

पारिजातकाचें बोलणें संपलें नाहीं तोंच बकुळीनें मधें तोंड घातलें.

"असलं कुसकं सौंदर्य घेऊन काय करायचं आहे ! जरा हात लावला कीं चुरगळून घाण नुसती !

**हात लावितां कोमेजुनियां दुर्गंधाचें गृह होसी**
**बकुळीपुढती पारिजातका, फुकट दिमाखा किति करिसी ?**

"माझी गोष्ट तशी नाहीं. मूर्ति लहान पण कीर्ति थोर. सुकलें तरी माझा सुगंध कमी होत नाहीं कीं बदलत नाहीं. मी प्रेमाचं प्रतीक आहें. खरं विशुद्ध प्रेम माझ्यासारखं असतं. काया सुकली तरी हृदयांतलं प्रेम आर्द्र असतं. त्याचा सुगंध पालटत नाहीं. म्हणूनच मला लोक चाहतात. म्हणूनच माझे सर करून बायका बासनांत ठेवतात."

यापुढें माळिणीला ऐकवेना. तिला विषाद वाटला. तिनें त्यांची समजूत काढावयाचें ठरविलें. ती कळवळ्यानें बोलूं लागली.

"माझ्या लाडक्या पुष्पबालकांनो, तुमच्या अंगांत आज कलि शिरला आहे असं दिसतं. याच उद्यानभूमींत तुम्हां सर्वांचा जन्म झाला. इथेंच तुम्ही वाढलांत. तुमचं रंगरूप वेगळं असलं तरी एकच जीवनरस तुमच्या शरिरांत खेळत आहे. म्हणून तुम्ही भावंडं आहांत. एकाच भूमींत

जन्मलेल्या भावंडांनीं कलह माजवणं हें बरं नव्हे. एकानं दुसऱ्याला तुच्छ लेखणं योग्य नव्हे.

**सर्वांठायीं सद्‌गुण कांहीं परमेशानें ठेवियले**
**कोणीं कोणा तुच्छ मानणें यास्तव मुळिं नच तुम्हां भलें**

जगांत निरुपयोगी वस्तु नाहीं. प्रत्येकाला कांहींतरी गुण देऊनच ईश्वरानें या विश्वपटावर धाडलं आहे. सर्वांना त्यानं एकच संदेश दिला आहे. 'एक व्हा अन् सत्कार्यीं निजगुण लावा.' तुम्हीं दुसऱ्याशीं मनमिळवणी केलीत कीं तुमच्या गुणांचा विकास होईल. द्वेष धरलांत, कीं तुमच्या अंगचे गुण करपतील. दुसऱ्याला खालीं ढकलूं पहाणारा त्याच्याबरोबर स्वतःहि खालीं पडतो. दुसऱ्याला सहानुभूतीनं वर चढविणारा आपणहि वर जातो. प्रेमाच्या दृष्टींत मंगल आहे. प्रेमाच्या बोलांत कल्याण आहे. द्वेषानं शक्तीचा व्यय होतो. प्रेमानं सामर्थ्य वाढतं. दुसऱ्याला निखंदून बोललं म्हणून कोणी मोठा ठरत नाहीं. आपलं मोठेपण स्वतःच्या मुखानं मिरवूं नये. मोठेपण ही दुसऱ्यानं बहाल करण्याची वस्तु आहे. तुम्ही आपापल्यापरी सगळींच श्रेष्ठ आहां, सुंदर आहां. धन्याला तुम्हां सर्वांबद्दल प्रीति आहे म्हणूनच त्यानें तुम्हांला आपल्या बागेंत फुलविलं."

तीं फुलें शहाणीं होतीं. भावनेच्या एका तिरमिरींत तीं भांडलीं; पण लगेच त्यांना आपली चूक कळून आली. माळिणीवर त्यांचा विश्वास होता. ती सांगते तें आपल्या कल्याणाचें आहे ही त्यांची खात्री होती. माळिणीचे सदुपदेशाचे बोल त्यांच्या अंतरीं ठसले. त्यांनीं एकमुखानें तिला मान्यता दिली—

**दृढ प्रेम धरुनि मानसीं जनां सुख देऊं**

तिनें मग त्या सर्वांचा मिळून सुंदर हार बनविला. मध्यभागीं गुलाबाचा गुच्छ योजला. शेजारीं शेवंतीचा पाट मांडला. प्रत्येक फूल रंग अन् आकार यांची संगति साधून गुंफलें. सर्वांचा योग्य तो मान राखला गेला. सर्वांनाच समाधान झालें. त्या हारांत व्यक्तिशः प्रत्येक फूल तर शोभत होतेंच, पण सर्व मिळून जी एक संघटित समष्टि निर्माण झाली होती, सहकार्यात्मक संगति झाली होती तिची शोभा कांहीं न्यारीच दिसत होती.

भारतांत हें प्रेम, हें ऐक्य केव्हां बरें प्रगटेल!

---

# फुलांचें भांडण

**गुलाब :**

“ गुलाब माझें नांव केवढें साऱ्या त्रिभुवनिं गाजतसे
सर्व फुलांमधिं मध्य पदातें आत्मगुणांनीं सजवितसे
मी सर्व फुलांचा राजा
किती रंग सुंदर माझा
असा सुगंध कवणा दूजा
मला कशाला परवा तुमची दूरचि व्हा रे दूरचि व्हा ”

**माळीण :**

“ नका नका रे भांडूं तंडूं वाद जगीं हा नच बरवा ” १

**शेवंती :**

“ शेवंती मी कितितरि सुंदर असतां गोष्टी वदसि अशा
धीटपणा हा काय गुलाबा ! लपव पाकळ्या आंत कशा
मी खरी फुलांची राणी
असा सुवास केव्हां कोणीं
अनुभविला कां दुजा जनीं
पीत धवलशा अमित पाकळ्या पाहुनि माना तुम्हि लववा ”

**माळीण :**

“ नका नका रे—” २

**सोनचांफा :**

“ सुवर्णचंपक नांव विसरुनी बडबड करितां हें बघुनी
मूर्खांनो, मज हंसूं येतसे लवकरि जा ‘ काळें ’ करुनी

लाजे सुवर्ण मजला बघुनी
जग सुगंध टाकी भरुनी
जन घेती मज आदरुनी
तुमचा राजा मीच शोभतों अभिषेकातें मज करवा ''

**माळीण :**

" नका नका रे—'' ३

**जाई :**

" दर्प दरवळे उग्र तुझा किति नाजुकपण मुळिं तुजसि नसे
चांफ्या, कसला गर्व वाहसी ? बघ जाईचें रूप कसें
मी पहा किती सुकुमार !
धवलकांति, बघ ही बहार
मम सुगंध मोहक फार
गर्व सोडुनी सर्व मिळोनी श्रेष्ठपणा तुम्हिं मज द्यावा ''

**माळीण :**

" नका नका रे—'' ४

**पारिजातक :**

" तुमच्या एकाच्याही अंगीं मोहक गुण मुळिं नच दिसला
पारिजात हा म्हणुनिच देवें स्वर्गामधुनि आणविला
कल्पतरूच्या अंगापासुनि
रक्त-धवल हे दुरंग घेउनि
मधुर परिमला भरितों भुवनीं
पुष्पराज मज यास्तव मानुनि वाद फुलांनो, झणि मिटवा ''

**माळीण :**

“ नका नका रे—” ५

**बकुळी :**

“ हात लावितां कोमेजुनियां दुर्गंधाचें गृह होसी
बकुळीपुढती पारिजातका, फुकट दिमाखा किति करिसी
मी कोमल सानी मूर्ती
परि मोठी मजला कीर्ती
जाणुनि जन कंठीं धरिती
दृढ प्रेमाचें मीच चिन्ह रे राणी अपुली मज म्हणवा ”

**माळीण :**

“ नका नका रे—” ६

**माळीण :**

सर्वांठायीं सद्गुण कांहीं परमेशानें ठेवियले
कोणीं कोणा तुच्छ मानणें यास्तव मुळिं नच तुम्हां भलें
चला चला या एकवटोनी सत्कार्यीं निज गुण लावा
नका नका रे भांडूं तंडूं वाद जगीं हा नच बरवा ” ७

**सगळीं फुलें :**

“ हें खरें, बोलती बरें, वागुं तेविं रे, चला एक होऊं
दृढ प्रेम धरुनि मानसीं जनां सुख देऊं
सुकुमार, बनवुंया हार, तोषवूं फार, या सुजनकंठा
सोडुनी देउंया झणी भांडणें तंटा
आम्हि मुलें, मानवी फुलें, तोषवूं कुलें आपआपुलीं
सद्बुद्धि धरुनि सर्वदा करूं कृति चांगली ! ” ८

# अभिमन्यु

## [ कथासूत्र व रसपरिचय ]

कविकुलगुरु कालिदासानें महाभारताला 'प्रतिपर्वरसावह' असें म्हटलें आहे. त्याचीं अठरा पर्वें लक्षांत आणून ज्ञानेश्वरमाउली त्याला अठरा पाकळ्यांचें कमळ म्हणते. गीता हा त्यांतला मकरंद आणि गीतातत्त्वज्ञान जीवनांत जोपासणारे सत्त्वधीर, रणधीर अन् कर्तव्यधीर असे महापुरुष हे त्या कमळांतले यशोगंधित परागरेणु आहेत.

अभिमन्यु हाहि एक अशा महापुरुषांपैकींच आहे. त्याचें जीवन आणि मरण म्हणजे जणुं विजेची तेजस्वी नि स्फूर्तिदायी चमक! त्याचें चरित्र म्हणजे मूर्तिमंत वीररसाचें आख्यान. त्याच्या देहत्यागाचा प्रसंग तर विलक्षण करुणोदात्त आहे.

बायकांना भक्तकथा अन् वीरकथा या फार आवडतात. त्यांतल्या त्यांत अभिमन्यूची कथा विशेष. कारण तो वयानें कोवळा असल्यामुळें त्यांच्या कौतुकांत वात्सल्याची 'अमृतधारा' मिसळते. ती कथा ऐकतांना अभिमन्यु हा आपलाच लाडका बाळ आहे अशी त्यांची भावना होत असावी. सुभद्रेच्या मातृहृदयाशीं तर त्या एकदम समरस होतात. मी प्रवचनकार असल्यामुळें मला या गोष्टीचा कैक वेळां अनुभव आहे.

अशी ही दिव्य कथा पुराणिकाच्या किंवा हरिदासाच्या मुखानें ऐकून कोण्यातरी सहृदय माउलीला काव्याचें स्फुरण झालें आहे अन् तिनें हा कवनहार गुंफून वीर-शय्येवर पहुडलेल्या अभिमन्यूच्या गळयात घातला आहे. हें गाणें स्त्री–समाजांत प्रिय आहे. देशावर हें दुमदुमलें, तसे त्याचे पडसाद सह्याद्रीच्या घाटाखालीं कोंकणांतहि उमटले आहेत.

कै. गडकऱ्यांनीं 'पुण्यप्रभाव' नाटकांत योग्य समय साधून कालिंदीच्या तोंडीं यांतलीं कांहीं कडवीं घातलीं आहेत. तीं कडवीं ऐकतांना त्या प्रवेशांतल्या करुणरसाला कशी अमावास्येची भरती येते त्याचा अनुभव हजारों प्रेक्षकांनीं पाझरत्या डोळ्यांनीं घेतलेला आहे. कै. पेंढारकरानीं ग्रामोफोनच्या

तबकडीवर हें मुद्रांकित केलें आहे. कै. पेंढारकर हे नामवंत गवई होते आणि त्यांनीं आपल्या विशिष्ट ढंगानें तें गाइलें आहे ही गोष्ट खरी असली, तरी एका सहृदय माउलीच्या मुखांतून त्याचा जो आविष्कार मीं ऐकला त्याचेच स्वर अद्यापि माझ्या कानांत झंकारत आहेत.

ज्या प्रसंगावर हें गाणें रचलें आहे तो असा—

द्रोणानें 'धर्मराजाला जिवंत पकडून देईन' असा दुर्योधनाजवळ पण केला होता. पण नरवीर अर्जुन जोंवर युद्धाची आघाडी संभाळून आहे तोंवर हा पण सिद्धीला जाणें शक्य नव्हतें. म्हणून मग कौरवांनीं एक युक्ति केली: संशप्तक नांवाच्या कडव्या गण-सैन्याला दुसरीकडे उठावणी करायला लावलें. त्यांनीं ती केली. अर्जुनाला त्यांचा मोड करण्यासाठीं तिकडे जाणें भाग पडलें. पार्थाबरोबर त्याचा सारथी श्रीकृष्णहि गेला.

इकडे द्रोणानें चक्रव्यूह रचला. व्यूह म्हणजे स्थलकाल पाहून केलेली विशिष्ट प्रकारची सैन्य-रचना. शत्रूचें अधिकांत अधिक नुकसान व्हावें अन् आपली फळी फुटूं नये, हा व्यूह-रचनेचा हेतु. चक्रव्यूह म्हणजे सगळ्या व्यूहांचा राजा. महाजटिल.

हा व्यूह बांधून पांडवांवर आक्रमण सुरू झालें. धर्माचें काळीज गडबडलें. आज आपला घातवार उजाडला असें त्याला वाटलें. कारण चक्रव्यूह फोडण्याचें सामर्थ्य अन् कसब पांडवांपैकीं एकाजवळहि नव्हतें. ती कला ठाऊक होती ती एका अभिमन्यूला. पण तो पडला वयानें लहान. त्याच्यावर कशी ही जबाबदारी टाकायची! धर्मासह चौघां बंधूंनीं इकडून तिकडून बराच प्रयत्न करून पाहिला. पण व्यूहाचा एक कपचाहि ढळेना. उलट पांडव-पक्षाची हानि मात्र जबर होऊं लागली. हा प्रकार अभिमन्यूला पाहवेना. त्यानें धर्माकडे अनुज्ञा मागितली अन् धर्मानें निरुपाय म्हणून ती दिली. अभिमन्यूच्या रणोत्साहाला आकाश ठेंगणें वाटलें.

**पुसुनि धर्माला। नमस्कार केला**
**हाका मारि सारथ्याला**
**जोड रे घोडे। आपल्या रथाला**
**धर्मे आज्ञा दिली मला**

किती साध्या पण गोड ओळी! अभिमन्यूला जी घाई झाली, जो हर्ष उचंबळला त्याचें प्रतिबिंब या पद-पंक्तींत पडलें आहे. कवयित्रीच्या मनांत नसतांनासुद्धां सहज एकदोन अनुप्रासहि साधून गेले आहेत.

अभिमन्यु सोळा वर्षांचा कुमार पण तो उत्तरेचाच नव्हे तर रणश्रीचाहि 'अतुलप्रभाव नवरा' होता. 'अपर नवार्जुनु' म्हणून 'ज्ञानियांच्या राजा' नें त्याला वाखाणलें आहे. 'उदयगिरीवरचा दिनकर' म्हणून श्रीधरानें त्याला गौरवलें आहे.

तो रथावर चढला अन् शत्रुसैन्याला भिडला. समोरचे दहा सहस्र रथी त्यांनें धडाक्यासरशीं लोळवले. हत्तींच्या सोंडा तोडल्या. घोड्यांच्या माना मोडल्या. पायदळाच्या तडातोडीची तर गणनाच नाहीं. कवयित्री म्हणते, त्याचें वय धाकुटें होतें पण धैर्य अचाट अन् अफाट होतें. बळिवंताचेंहि हृदय हादरून सोडणारें तें संहारकर्म पाहून कवयित्री त्याला '**जसा शोभला पशुपति**' अशी उपमा देते. दहा ओळी लिहून जें कार्य होत नाहीं तें एका अन्वर्थक उपमेनें होतें. पशुपतीशीं त्याची सांगड घालतांच श्रोत्यांचा आदर वाढला. भक्तिप्रेम दुणावलें. त्याच्या मानवतेंत दिव्यतेची झळक शिरली.

**रणीं मिसळला। सुभद्रेचा सूत**
**सैन्य पाडिलें असंख्यात**
**शरांनीं शीरें। कितीक उडवीत**
**राजे झाले भयाभीत**
**सोळा वर्षांचें। वय दिसे लहान**
**युद्ध केलें निर्वाण**

इथें अभिमन्यु न म्हणतां 'सुभद्रेचा सुत' म्हटलें. जेव्हां आदरार्थी बोलायचें असतें तेव्हां पुरुषाला अमक्या तमक्या आईचा मुलगा म्हणायचें अशी पूर्वीची रूढि आहे. भीष्माला गांगेय, अर्जुनाला कौन्तेय, षडाननाला कार्तिकेय अशीं जीं नांवें आहेत तीं त्या महापुरुषांविषयीं गौरव व्यक्त करतात.

अभिमन्यु बाळानें कौरववीरांना 'त्राहि भगवन्' केलें. द्रोण क्षणभर लढायचें सोडून कौतुकानें भरलेल्या दृष्टीनें त्याला निरखूं लागला. त्यानें

मारलेली धडकच तशी होती. दुर्योधनाच्या हृदयांत काहीं आपुलकीचा जिव्हाळा असता तर त्यानें अष्टौभावानीं उचंबळून त्याला मिठी घातली असती. पण त्यानें रडवें तोंड करून मिठा मारली ती द्रोणाला. आणि त्याला बोलला तें हें कीं, 'तुम्ही मनापासून लढत नाहीं. तुम्ही त्या पोराला मारायच्याऐवजीं त्याचें रक्षणच करतां.'

त्यांचें असें बोलणें चाललें आहे तोंच अभिमन्यु चक्रव्यूहाच्या काळजांतच घुसला. जयद्रथाला वाटलें कीं, 'बरा सांपडला आतां.' पण तोंडाची वल्गना वाऱ्यावर विरायच्या आंतच अभिमन्यूचा शर-मार असह्य होऊन त्याला पायांत बळ आणावें लागलें. जी गति जयद्रथाची तीच शकुनीचीहि झाली. मग मात्र द्रोणानें निकरानें लढायचें ठरवलें.

**मग द्रोणांनीं । तोडिलें धनुष्य**
**फोडिलें अंगींचें कवच**
**मोडिला रथ । झाला विरथ**
**धांवुनि आला जयद्रथ**
**बाळ घाबरला । चोंहिंकडे पाहे**
**म्हणे, 'हें धर्मयुद्ध नोहे !'**

असा सगळ्यांनींच त्याला गराडा घातला. या वेळीं त्याला कोणी तरी साहाय्यकर्ता हवा होता. पण त्याच्यावांचून व्यूहांत इतर कोणाचाच प्रवेश झाला नव्हता. त्यामुळें मागूनपुढून सर्व बाजूंनीं कौरव त्याला मारूं लागले. 'एकाशीं अनेकांनीं लढणें हें धर्मयुद्ध नव्हे' असें त्यानें म्हटलें. पण धर्मा-धर्माच्या गोष्टी ऐकणार कोण? त्यांना कशाहि रीतीनें अभिमन्यु मरायला हवा होता.

आणि त्याप्रमाणें झालेंहि. अभिमन्यु गदेच्या प्रहारानें घायाळ होऊन रण-भूमीवर पडला. तो आतां घटका-पळें मोजूं लागला. त्याची ती दशा पाहून जयद्रथाला राक्षसी उन्माद चढला अन् त्यानें धांवत येऊन त्याच्या मस्तका-वर लाथ मारली.

संशप्तकांचा निःपात करून अर्जुन सूर्यास्ताच्या वेळीं परतला तों त्याला अपशकुन होऊं लागले. त्याचा डावा डोळा लवूं लागला. आज कांहीं तरी

अशुभ वर्तमान ऐकावें लागणार अशा भावनेनेंच तो शिबिरांत आला. पाहतो तों धर्म-भीम खालीं माना घालून बसलेले. सर्वांच्या नेत्रांतून अश्रु-प्रवाह अन् तोंडें वाळलेलीं. त्यानें विचारलें, ' माझा बाळ कुठें गेला ? ' पण प्रथम कोणीच बोलेना. शेवटीं भीमानें घडलेलें वर्तमान हळूच सांगितलें.

' हिरा पदरिंचा तुटून पडला ' हे अर्जुनाचे पहिले उद्गार अन् पुढें आकांत. त्याला रणांत पुढें घातल्याबद्दल त्यानें भावांना दोष दिला.

देव अर्जुन । रणामध्यें गेले
बाळक धरणिवरी लोळे

कुरळ केस । रक्तानें भरले
आवरुन पार्थो स्तब्ध केलें.

धरुन पोटाशीं । चुंबिलें तयाला
मुखचंद्र तो धुळिनं भरला

शिरीं पाहीला । गदेचा ग टोला
गहिंवर देवाला आला

प्रत्यक्ष पाहून लिहिल्यासारखें हें वर्णन आहे. कवयित्रीच्या क्रांतदर्शित्वाचा लहानसा किरण इथें चमकतो. श्रोत्यांच्या हृदयमर्माला जाऊन भिडण्याचें सामर्थ्य या कडव्यांत निःसंशय आहे. साध्या शब्दांतला परिणामकारकपणा पाहायचा असेल तर तो या कडव्यांत पाहावा. कवयित्री म्हणते कीं, अभिमन्यूची ती दशा पाहून देवालाहि गहिंवर आला. अर्जुन रडला, इतर पांडवहि रडले यांत नवल नाहीं. कारण त्यांच्या अपत्यप्रेमाचे धागे अभिमन्यूच्या प्राणांशीं गुंतलेले होते. देवाला मायाममतेचे पाश नाहींत. जन्माच्या द्वारानें कोणी आलें अन् मृत्यूच्या द्वारानें कोणी निघून गेलें म्हणून देवाला सुखदुःखाची बाधा होत नाहीं. त्याच्या ' ॐ पूर्णा ' त कांहींच न्यूनाधिक्य होत नाहीं. येणें-जाणें हे शब्दच त्याच्या कोशांत नाहींत. पण त्याच्याहि डोळ्यांत अश्रु आले. हेंच अभिमन्यूचें लोकोत्तरत्व. देवाच्या अंतरांत माया घालून त्याला रडविणारा पुरुष किती मोठा असेल बरें !

अभिमन्यूनें क्षीण शब्दांत त्यांना सगळा वृत्तान्त सांगून म्हटलें, " बाबा, मला वेदना होताहेत. अगदीं सोसवत नाहींत अशा कळा लागल्या आहेत."

" खरेंच बाळा ! गदेच्या प्रहारानें मस्तक फुटून गेलें आहे तुझें–" अर्जुन तें मांडीवर घेऊन म्हणाला.

" नाहीं बाबा, शस्त्रांचे घाव आणि गदेचे आघात हे आमचे वीरभोग आहेत. ते कधीं दुस्सह होत नाहींत. वेदना होतात त्या जयद्रथानें मस्तकीं हाणलेल्या लाथेच्या !"

इतकें बोलून त्या वीरयुवकानें भगवंताचें श्रीमुख पहात पहात प्राण सोडला.

**देव भगवान । भगिनिकडे गेला**
**थोर आकांत तिनें केला**
**माझा सौभद्र । मजवरि कां रुसला**
**स्तनीं माझे पान्हा आला**

आईला आपला मुलगा कायमचा सोडून गेला तरी तिला तो गेला असें वाटत नाहीं. तिला ती अभद्र कल्पना करवतच नाहीं. ती म्हणते, 'माझा बाळ माझ्यावर रुसला. कां बरें रुसला असेल ? मीं न्हाऊं घालायला आळस केला का ? जेऊं घालायला विसरलें का ? काय आगळीक झाली असेल माझ्या हातून ?' —असें आहे हें मातृहृदय !

सुभद्रेच्या त्या पुत्र-शोकाचें वर्णन कोणता महाभाग करूं शकेल ! पण तिला स्वतःपेक्षांहि आपल्या सुनेची–उत्तरेची–काळजी अधिक वाटली. ती म्हणते—

**कशी मी पाहुं उत्तरेला ?**

या एकाच वाक्यांत सगळें कांहीं सार आलें. उत्तरेची ती सौभाग्यहीन मूर्ति तिच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. स्वतःच्या दुःखाच्या प्रसंगीं दुसऱ्याच्या दुःखाची जाणीव ठेवणारीं सुभद्रेसारखीं हीं माणसें किती मोठ्या मनाचीं असतील बरें ! अन् या गोष्टीचा नेमका उल्लेख करणारी कवयित्री तरी किती सहृदय अन् आत्मौपम्यबुद्धीची असेल !

नंतर इकडे अर्जुनानें प्रतिज्ञा केली कीं, 'उद्यां सूर्यास्ताच्या आंत जयद्रथाला मारीन आणि हें न झाल्यास अग्निकाष्ठें भक्षण करीन!' दुसरा दिवस उजाडला. अर्जुन कंदन करीत सुटला. सगळया कौरवांनीं जयद्रथाभोंवतीं कोंडाळें केलें. सूर्यास्ताचा समय जवळ आला पण जयद्रथाचें नखहि अर्जुनाला दिसलें नाहीं. शेवटीं देवाला माया रचावी लागली. त्यानें सूर्याच्या आड आपलें सुदर्शन धरलें. सर्वांना वाटलें कीं सूर्यास्त झाला. मग जयद्रथाला निर्भय वाटलें. तो उघड्यावर आला. इतक्यांत सुदर्शन बाजूला घेऊन देवानें अर्जुनाला म्हटलें, 'हा सूर्य, हा जयद्रथ!'

दुसऱ्याच क्षणीं अर्जुनाच्या बाणानें जयद्रथाचें शिर अंतराळांत भिरकावलें. तें नेमकें त्याचा बाप समुद्रतीरीं संध्यावंदन करीत होता त्याच्या मांडीवर पडलें. त्यानें तें भूमीवर लोटलें. बाप-लेक दोघेहि एकाच वेळीं समाप्त झाले.

अभिमन्यूची रोमहर्षक कथा ही अशी आहे. अभिमन्यूचें हें मरण नव्हे, तर ध्येयासाठीं, न्यायासाठीं, स्वातंत्र्यासाठीं आत्मसमर्पण आहे. देहाकारानें मरण पण आत्मरूपानें अमरपद त्याला लाभलें. तो देहात्मा होता, तो विश्वात्मा झाला. जिथें जिथें न्यायासाठीं, स्वातंत्र्यासाठीं धडपड आहे, संग्राम आहे, तिथें तिथें तो अनेक वेळां अवतरला आहे. भरतखंडांत तर अभिमन्यूंची परंपराच लागली आहे. पानिपतावरचा विश्वास आणि जनकोजी, धर्मवीर हकीकत राय आणि खुदिराम बोस, ती भगतसिंगादि त्रयी, चाफेकर आणि कान्हेरे, इत्यादि अल्पवयांत आत्मसमर्पणानें रणयज्ञ करणारे, स्फोटगोलांनीं क्रान्तीची घोषणा करणारे अन् पेटत्या पिस्तुलांनीं अन्यायाचा प्रतिशोध घेणारे हे सारे तरुण अभिमन्यूचेच नवे नवे अवतार होत. एकदम धडाकून पट घ्यायचा, जगाचे डोळे दिपवायचे अन् पसार व्हायचें, ही त्यांची कार्याची पद्धत. 'मी जगेन अन् तुला वनवास लावीन, मी सगळें लुटीन अन् तुझ्या हातीं नरोटी देईन,' अशी राक्षसी वृत्ति जोंवर जगांत थैमान घालते, तोंवर अभिमन्यु अवतार घेतच राहील. 'जगा अन् जगूं द्या' या भारतीय संस्कृतीच्या तत्त्वानुसार जर कधीं काळीं जग गुण्यागोविंदानें नांदूं लागलें तरच त्याची धगधगती आत्मज्योत परब्रह्मींच्या आनंदसागरांत विलीन होईल.

---

# अभिमन्यु

सकाळीं उठुनी । धर्मानं काय केलें
अभिमन्युसी बोलविलें
समसप्तक । अर्जुनास दिधलें
कौरव-दळ सिद्ध झालें
दुर्योधनाशीं । द्रोणानं पण केला
धरुनी देईन धर्माला
व्यूह-भेदाची । युक्ति आहे तुजला
बाळा जावें युद्धाला १

गेला अभिमन्यु । अभिमन्यु वीर रणीं
चक्रव्युह केला द्रोणांनीं ॥ ध्रु० ॥
पुसुनि धर्माला । नमस्कार केला
हांका मारि सारथ्याला
जोड रे घोडे । आपल्या रथाला
धर्में आज्ञा दिली मला
सूत म्हणे राजा । अपशकुन झाला
सूर्य कां दक्षिणेस आला
जाऊनि रे मारीं । कौरवांच्या मुलां
नाहिंतर जन्म व्यर्थ गेला २

रथीं बैसला । उत्तरेचा पती
मारिले दहा सहस्र रथी

वय लहान । तया नाहिं भीती
जसा शोभला पशुपति ३
हत्ती आणि घोडे । पायदळ किती
पाडिल्या लोथींच्या लोथी
वीर वारंवार । गदायुद्ध करिती
झाली त्रैलोक्यीं ख्याती
रणीं मिसळला । सुभद्रेचा सूत
सैन्य पाडिलें असंख्यात
शरांनीं शीरें । कितीक उडवीत
राजे झाले भयभीत
सोळा वर्षांचें । वय दिसे लहान
युद्ध केलें निर्वाण ४
मग दुर्योधन । रडत रडत आला
मिठी घातली द्रोणाला
पार्थपुत्रानें । प्रलय फार केला
हरविलें माझ्या सैन्याला
तुम्ही कां युद्ध । मनापासुन करा ना
कसें रक्षितां पांडवांना
इकडे पाहून । सांगे कर्णाला
शकुनि मामा पळुन गेला ५
ध्या ध्या म्हणुनी । विभूमधें गेला
जयद्रथाला क्रोध आला

द्रोणादिकीं शत्रु । दारिं उभा केला
फितुर सैन्यामधीं झाला
ह्याच्या पाठीशीं । येऊं देईना कोणा
तळमळ सुटलि भीमसेना
सांबप्रसादें । ते दिवशीं जय त्यांना
बळें हटविलें पांडवांना ६
मग द्रोणांनीं । तोडिलें धनुष्य
फोडिलें अंगींचें कवच
मोडिला रथ । झाला विरथ
धांवुनि आला जयद्रथ
बाळ घाबरला । चोहिंकडे पाहे
म्हणे, 'हें धर्मयुद्ध नोहे !'
पडला अभिमन्यु । अभिमन्यु वीर रणीं
चक्रव्युह रचिला द्रोणांनीं ७
इकडे किरीटी । म्हणे केशवाला
अपशकुन होति मला
मृगांचा कळप । सव्य हातिं गेला
लवतो माझा वाम डोळा
मला वाटतें । कोणि वीर पडला
माझा धर्म धरुन नेला
चल रे देवा । जाऊं शिबिराला
कळेल तें वर्तमान मला ८

कृष्ण-अर्जुन। शिबीरांत आले
राजे अधोमुखीं बसले
पुसे भीमाला। ‘ बाळ कुठें गेला ? ’
हळुंच सांगे, ‘ रणीं पडला ’
‘ अहा रे दैवा। कसा घाला पडला
हिरा पदरिंचा सुटुन पडला !
अहा रे दैवा। कसा घाला पडला
रणाचे तोंडीं बाळ दिला
पुत्र हा योगी। नाकळे देहाला ’
आवरुन पार्थाला धरिला ९
देव-अर्जुन। रणामध्यें गेले
बालक धरणिवरी लोळे
कुरळ केस। रक्तानें भरले
आवरुन पार्था स्तब्ध केलें
धरुन पोटाशीं। चुंबिलें तयाला
मुखचंद्र तो धुळिनं भरला
शिरीं पाहीला। गदेचा ग टोला
गहिंवर देवाला आला १०
बोले अभिमन्यु। झाला वृत्तान्त
‘ जयद्रथानें दिली लाथ
सूड घ्या त्याचा। करुनी पुरुषार्थ
मी पाहतों कृष्णा ! मुहूर्त ’

इतकें बोलूनी। समाधिस्त झाला
चंद्रलोकीं प्राण गेला ११
देव भगवान। भगिनिकडे गेला
थोर आकांत तिनें केला
' माझा सौभद्र। मजवरि कां रुसला ?
स्तनीं माझे पान्हा आला
माझा अभिमन्यु। असा रणीं पडला
कशी मी पाहुं उत्तरेला !
असो धिक्कार। तुझ्या धनुष्याला
प्राण माझा नष्ट झाला ' १२
पार्थ-श्रीकृष्ण। आले रणांत
पळत सुटला जयद्रथ
' अहा रे दुष्टा। पाप केलें बहुत
द्रौपदी छळिली वनांत
तूंच अपराधी। पुत्रास दिली लाथ
जवळि आला तुझा मृत्यु '
' दिवसापूर्वी। जयद्रथ वधिन ! '
शपथ केली अर्जुनानं
अहा रे सखया। कठिण केलास पण
' सिद्धी नेइल भगवान ' १३
इकडे कृष्णानें। काय मौज केली
सुदर्शना मधें घाली

‘ अरेरे ! पार्था, । कशी रात्र झाली
प्रतिज्ञा तुझी व्यर्थ गेली ! ’
मग कृष्णानें । काष्ठें मिळवीलीं
कौरव मंडळी आनंदली
इतकें पाहूनी । बोले यदुवीर
‘ पहा पाठिशीं दिनकर !
पुढें जयद्रथ । उडव त्याचें शीर ’
शर सोडिला वरचेवर
कंदुक ग जैसा । गगनिं गेलें शीर
पडे पित्याचे मांडीवर
पित्यानें ढकलीलें । पडलें क्षितीवर
त्यावरि पडलें त्याचें शिर
मृत्यु पावले । बाप-लेक दोन्ही
अघटित देवाची करणी ! १४

---

# रुक्मांगद आणि मोहिनी

[ कथासूत्र व रसास्वाद ]

सर्व क्षेत्रांत काशी, सर्व तीर्थांत गंगा, तसें सर्व व्रतांत एकादशी व्रत हें श्रेष्ठ आहे. नाना विष्णुव्रतांतलें हें मुख्य व्रत साक्षात् भगवंतानें कृपावंत होऊन इंद्राला सांगितलें. इंद्रानें देवांत आणि मुनिजनांत त्याचा प्रसार केला. दर पंधरवड्याला स्वर्गांत हें व्रत महोत्साहानें साजरें होऊं लागलें. ब्रह्मदेव अन् शंकर हेसुद्धा त्यांत सामील होऊं लागले.

सर्व देव एकत्र जमून त्या दिवशीं नारायणाची सामुदायिक पूजा करूं लागले. सुंदर आरास अन् समृद्ध षोडशोपचार श्रीहरीच्या सेवेसाठीं उभारले जाऊं लागले. मंत्रपुष्पांच्या वेळीं सर्व देवांनीं एकेक फुलांची ओंजळ वहायची म्हटलें तरी नंदनवनांतली अपार पुष्पसंपत्ति अपुरी पडूं लागली. इंद्राच्या आज्ञेनें मग गंधर्व, पृथ्वीवरचीं फुलें लुटून नेऊं लागले. नगरोनगरींचीं पुष्पोद्यानें फुलांविना भकास दिसूं लागलीं. गंधर्व वरून विमानांतून बागा टेहळीत अन् पहाटेच्या प्रहरीं अचूक तिथें उतरत.

एक दिवस टेहेळणी करीत असतां रुक्मांगद राजाची बाग त्यांना दिसली अन् त्यांच्या तोंडाला पाणी सुटलें. ती बाग राजानें नगराबाहेर वसवली होती. राजा फुलांचा मोठा शोकी होता. भरतखंडांतल्या सर्व जातींचीं फुलझाडें नि वेली त्यानें आपल्या बागेंत जोपासून फुलवल्या होत्या. शेंकडों माळी तिथें अहोरात्र खपत होते. वसंतग्रीष्मादि सहा ऋतु कसूर न करतां टवटवीत फुलांचा नजराणा राजाला अर्पून कृतार्थ होत होते.

रोज सूर्योदय होण्याच्या आंत माळी डोक्यावर फुलांच्या टोपल्या घेऊन राजद्वारीं हजर होत. राजा मग स्नान करून देवाची पूजा करी. फुलांनीं अन् हारांनीं देवाच्या मूर्तीला सजवी. उरलेलीं फुलें मग राणीवशांतल्या स्त्रियांचे केशपाश अलंकृत करीत. रुक्मांगदाचा राजवाडा विविध फुलांच्या मिश्र सुगंधानें सदैव दरवळलेला असे.

पण एक दिवस सकाळीं उठून पहातो तों सगळे माळी हात हालवीत

आलेले. राजानें कारण विचारतांच त्यांनीं सांगितलें कीं, 'रात्रीं फुलें कोणीं तरी चोरून नेलीं. उभ्या बागेंत झाडावर एकहि फूल शिल्लक नाहीं.'

राजाला वाईट वाटलें; पण करणार काय? त्यानें बागेवर रात्रीं जागता पहारा ठेवण्याबद्दल माळ्यांना बजावलें. पण दुसऱ्या दिवशींहि प्रकार तोच. तिसऱ्या दिवशींहि तसेंच. तीन दिवस राजाला फुलांचा उपास पडला. त्याचा पुष्पलुब्ध अंतरात्मा तळमळूं लागला. फुलांवांचून देवाची पूजा अंतरली अन् राजकुलांतल्या नारींचा शृंगारसाज अडून राहिला. त्यानें चिडून माळ्यांना ताकीद दिली.

**थोर कोपें राव बोलिला वचन**
**आम्हांस नाहींरे कोणाचा गुमान !**
**आज रात्रीं चोर द्यावे उमगून**
**नातरि सकाळीं घेइन तुमचा प्राण**

बिचारे माळी प्राणभयानें हिंपुटी झाले. त्यांनीं संघटितपणें रात्रभर पहारा ठेवला. तीन प्रहर संपून चवथा सुरू झाला. वरून दंव पडूं लागलें. माळ्यांच्या अंगांत थंडीची हुडहुडी भरली. चोरांची वेळ टळली, असें समजून ते एकत्र जमले. जवळच वांग्याच्या झाडांचीं सुकीं ताटें पडलेलीं होतीं तीं जमा करून त्यांनीं शेकोटी पेटवली अन् ते गारठलेले हातपाय शेकीत बसले. त्या शेकोटीच्या उजेडांत त्यांना झाडांवरचीं सकाळीं उमलणारीं फुलें दिसलीं. दंवबिंदूंचा अमृतरस पिऊन तीं पाकळ्या-पाकळ्यांनीं विकास पावत होतीं. माळ्यांचा जीव खालीं पडला. उद्यांचें मरण टळलें असें त्यांना वाटलें.

आणि त्याच वेळीं आकाशांत एक विमान घिरट्या घालूं लागलें. रोजच्या ठरलेल्या जागीं उतरण्यासाठीं तें सूर मारीत होतें. पण काय झालें कोणास ठाऊक! तें नीटपणें खालीं उतरण्याच्याऐवजीं एकाएकीं धाडकन् खालीं कोसळलें. माळी जिथें शेकोटीभोंवतीं बसले होते, त्यांच्याजवळच हा अपघात घडला.

माळी प्रथम घाबरले अन् नंतर जिज्ञासेनें विमानाच्याजवळ गेले. विमानांत देवदूत गंधर्व पालथे पडले होते. नम्रपणें हात जोडून माळ्यांनीं त्या देवदूतांना बोलते करण्याचा प्रयत्न केला. पण कोणीहि तोंडावाटे ब्र काढीना.

माळ्यांच्या मनाचा मोठा गोंधळ उडाला. पुढें काय करायचें अशा आविर्भावानें ते एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. शेवटीं त्यांनीं ठरवलें कीं, घडलेला प्रकार राजाच्या कानीं घालावा. पुढें यांचें काय करायचें तें त्यालाच ठरवूं दे.

राजानें तिथं येऊन त्यांची स्थिति पाहिली. त्यालाहि त्यांचें रूप आणि तेज पाहून अचंबा वाटला. कांहीं प्रश्नोतरें झाल्यावर ते गंधर्व असल्याचें आणि विष्णूच्या पूजेसाठीं फुलें चोरून नेत असल्याचें त्याला कळून आलें. तो म्हणाला—

**तुम्ही बरे पुण्यशील हो दिसतां**
**चौर्यकर्म कासया आचरितां ?**
**एकाचें काढुनि एकासि हो देतां**
**यांत तुम्हां काय होईल साध्यता ?**

कवयित्रीनें या ठिकाणीं एक नैतिक प्रश्न उपस्थित केला आहे. एकाला लुबाडायचें अन् दुसऱ्याला मदत करावयाची हें पुण्य होईल का? ईश्वराला अष्टभोग अन् षोडशोपचार आवडतात. पण दुसऱ्याची नागवण करून त्या वैभवानें केलेली पूजा-अर्चा देव स्वीकारील का? कधींहि नाहीं. देव तिथून पळून जाईल! धर्मासाठीं अधर्म करूं नये, पुण्यासाठीं पाप जोडूं नये असाच देवाचा आदेश आहे. देवाच्या पूजेला फुलांच्या राशि नकोत. एकच फूल अथवा फुलाची पाकळीसुद्धां चालेल. नैवेद्याला बदाम-बेदाणा घालून केलेला शिराच हवा असें नाहीं, नुसतें मीठ घालून शिजवलेल्या कण्याहि चालतील. जें पूजाद्रव्य तुम्ही आणाल तें तुमच्या श्रमाचें अन् घामाचें असलें पाहिजे एवढाच त्याचा कटाक्ष आहे. मंदिर उभारण्यासाठीं गरिबाच्या झोपड्या पाडूं नका. देवळांत नंदादीप लावण्यासाठीं भोळ्याभाबड्यांच्या घरांतला दिवा विझवूं नका. विहिरी अन् तलाव खोदण्यासाठीं दीन-दुबळ्यांच्या डोळ्यांत पाणी आणूं नका. तसें कराल तर पुण्य तेंच पापरूप होईल. जीवनच नरकमय बनेल. हें धर्माचें अन् नीतीचें मुख्य तत्त्व आहे. आधीं पापकर्माचा चिखल अंगाला माखून घ्यायचा अन् मग पुण्याच्या पाण्यानें तो धुवून काढायचा हा धार्मिकपणा नसून उपद्व्यापी दांभिकपणा आहे. कवयित्रीनें हाच आशय ‘काय होईल साध्यता?’ या प्रश्नरूप वाक्यांत ध्वनित केला आहे.

राजाचा तो वर्मी लागणारा प्रश्न ऐकून गंधर्व म्हणाले, 'आम्हांला पापपुण्य कळत नाहीं. धन्याची आज्ञा ही एकच गोष्ट आम्ही जाणतों. पण आतां मुख्य अडचण अशी आहे कीं, आमचं हें विमान वर कसं चढेल ?'

राजाला त्यांची अडचण कळली. राजा उदारहृदयी होता. परोपकार करण्यांत त्याला आनंद वाटत असे. दुसऱ्याला आपत्तींतून वर काढण्यासाठीं केवढाहि मोठा त्याग करायला तो सर्वभावें तयार होत असे. तो गंधर्वांना बोलला—

"तुम्हांला मी काय मदत करूं तें सांगा. माझं सगळं जन्मार्जित पुण्य घेऊन जर तुमचं विमान वर चढत असेल तर तेंहि मी आनंदानें समर्पीन !"

"दानशूर राजा ! तुझ्या पुण्याचे हिमालय आमच्या उपयोगी नाहींत. जर कोणीं एकादशीचा उपवास केला असेल तर त्याच्या त्या पुण्यानं आमचं विमान उडेल ; अन्यथा नाहीं."

राजाला एकादशी हें काय प्रकरण आहे तें ठाऊक नव्हतें. गंधर्वांनीं तें व्रत अन् त्याचा महिमा त्याला समजावून सांगितला. रुक्मांगदाला तो पटला. त्यानें राज्यांत दूत पाठवले अन् कालच्या एकादशीला कोणी उपाशीं राहिला असल्यास त्याला तिथें घेऊन येण्याची आज्ञा केली.

नगरांत दौंडी पिटली गेली. घरोघर शोध सुरू झाला. पण जिथें विचारावें तिथें सगळे जेवलेले. त्याच्या राज्यांत कोणी अन्नाला महाग नव्हताच मुळीं. मग सुखासुखी उपाशी कोण राहणार ! पण राजाच्या अन् गंधर्वांच्या सुदैवानें एका परटाच्या घरांत एकादशीचा उपवास घडला होता. सासू अन् सून दोघी कडाक्यानें भांडल्या होत्या अन् एकमेकींच्या रागानें त्यांनीं अहोरात्र अन्नग्रहण केलें नव्हतें.

दूतांनीं ही हकीगत राजाला कळवतांच त्यानें पालख्या पाठवल्या आणि दोघींना आपल्याकडे आणवलें. सासूसुना वाजत गाजत गंगेवर स्नान करून आल्या. राजानें त्यांना सुंदर वस्त्रें अन् टोपलीभर दागिने लेववले. ठुमकत मुरडत त्यांनीं सोन्याची झारी हातांत घेतली अन् 'अडखळून पडे अन् दंडवत घडे' म्हणतात ना, तसल्या त्या उपवासाचें श्रेय गंधर्वांना ओपलें.

**धार ओतिती त्या सासू आणि सून**
**त्यांच्या पुण्यें वरि चढलें विमान !**

राजानें त्या दिवसापासून एकादशीचें व्रत धरलें. आपल्या राज्यांत सर्वांनीं एकादशीचा उपास केलाच पाहिजे, असा कायदाच करून टाकला. जो व्रत मोडील त्याला हद्दपारीची शिक्षा ठेवली. एकादशी हा ‘ हरिदिन ’ म्हणून जाहीर केला. बाळगोपाळांना, म्हाताऱ्याकोताऱ्यांना, गोठ्यांतल्या गाई-वासरांना अन् पिंजऱ्यांतल्या शुकसारिकांनासुद्धां त्या दिवशीं अन्नाचा कण मिळायचा नाहीं. सगळीकडे पूजेअर्चेची धांदल. जिकडे तिकडे सुगंधी धूपांचा परिमल. रात्रीं तर कथाकीर्तनांनीं सगळें नगर दुमदुमायचें. नाम-घोषानें आकाश कोंदाटून जायचें.

त्या पुण्यप्रभावानें तिथें मरणारा प्रत्येक प्राणिमात्र पार्षदांनीं आणलेल्या विमानांत बसून सरळ वैकुंठाला जाऊं लागला. यमदूत रिक्त हस्तानें यमाकडे येऊं लागले. त्यांना एकहि शिकार मिळेना. त्या मानानें यमपुरीला धोका बसला. बरेचसे यमदूत जांभया देत काळ कंठूं लागले. चित्रगुप्ताचे वह्या तपासण्याचे श्रम बरेच कमी झाले. यमाच्या काळ्या रेड्यालाहि रवंथ करायला आतां खूप वेळ मिळूं लागला. यमपुरीला ओसरलेल्या बाजाराची अवकळा आली.

यमानें ब्रह्मदेवाकडे जाऊन तक्रार केली. आपल्या अधिकाराचा राजीनामा त्याच्यापुढें गुदरला. ब्रह्मदेवानें त्याला सगळें ठीक करण्याचें आश्वासन दिलें. रुक्मांगदाचा व्रतभंग केल्यावांचून हें गाडें रुळावर येणार नाहीं ही त्याची खात्री झाली. त्यानें मग मोहिनी नांवाच्या अप्सरेला रुक्मांगदाला व्रतभ्रष्ट करण्याची आज्ञा देऊन भूलोकीं पाठवलें.

मोहिनी विजेसारखी चमकत खालीं उतरली अन् राजवाड्याच्या प्रांगणांतल्या तुळशीकट्यावर विराजमान झाली. राजदूत विस्मयानें स्तंभित झाले अन् त्यांनीं राजाला वर्दी दिली. मोहिनीच ती. तिचें सौंदर्य काय वर्णावें ! राजा तर पाहतांक्षणींच दिपून गेला. त्याला वाटलें कीं, आपल्या तुळशीवृंदावनाशेजारीं सोनेरी वेलच उगवली आहे. किती चमकदार पण किती नाजूक ! तो निसर्गाचा कविराणा वर्डस्वर्थ म्हणतोना, तशी—

“ A dancing shape, an image gay
To haunt, to startle, and way-lay ”

राजा येऊन समोर उभा राहिला तरी तिच्या गालांवर लाजेची लाली चढली नाहीं. तिची अर्धोन्मीलित नासाग्रदृष्टि चळली नाहीं. राजानेंच मग बोलायला सुरवात केली —

**राव पुसे, " तूं कोणाची ग कोण ?**
**एवढी सुंदर तूं कोणाची कामीन ? "**
**मोहिनी म्हणे, " मी आहें रे तापसी**
**योग्य भ्रतार पाहतें आपणांसी**
**जो मन देईल माझेया वचनासी**
**माळ घालुनी पति करीन मी त्यासी. "**

तिचे ते बोल राजाला खडीसाखरेसारखे मधुर वाटले. तो तिला पट्टराणी करण्यासाठीं उत्सुक झाला. ' तुझ्या अर्ध्या वचनांत मी वागेन ' अशी त्यानें तिला भाक दिली. दुसऱ्याच घटकेला मोहिनीनें विधिपूर्वक आपला नाजुक गोरापान हात राजाच्या हातीं दिला. संध्यावळी राणीला नवी सवत आली.

तिनें राजावर मोहनास्त्र पसरलें. तो तिच्या नादानें राजकारणाला पारखा झाला. प्रजापालनाला अंतरला. प्रेमाच्या पट्टराणीलाहि विसरला. मोहिनीचा एक शब्द तिथें रुक्मांगदाचे पंचप्राण अशी परिस्थिति निर्माण झाली.

असे कांहीं दिवस गेल्यावर एकादशी आली; पण तिचा त्याला पत्ताहि नव्हता. जेव्हां राजदूतांनीं नगरांत डांगोरा पिटला तेव्हां कुठें त्याच्या लक्षांत आलें कीं, आज एकादशी आहे. तो ध्वनि कानीं पडतांच राजानें मंचकावरून ताडकन् खालीं उडी टाकली. दुसऱ्याच क्षणीं मोहिनीनें त्याचा हात घट्ट धरून म्हटलें, ' कुठें निघालांत ? '

" आज एकादशी. मला उपोषण आहे. आज सगळे भोगविलास वर्ज्य. आजचा संपूर्ण दिवस ईश्वराच्या सेवेसाठीं अन् चिंतनासाठीं आहे. सोड, मला जाऊं दे."

" राजकुलांत निर्माण झालेले वीरपुरुष तुम्ही ! उपासतापास कसले करतां !

**उपास पारणीं करावीं बैराग्यांनीं**
**राजसूय करावे राजेयांनीं**

" बसा मंचकावर. मी तुम्हांला चंदनाची उटी लावतें. तुमच्यासाठीं मीं हार तयार केला आहे तो गळ्यांत घालतें."

" छेः छेः ! भलतंच कांहींतरी ! प्राण गेला तरी मी उपास मोडणार नाहीं. या बाबतींत तुझं कांहीं चालायचं नाहीं."

" नाहीं कसं ? तुम्हीं मला तसं वचन दिलं आहे. तुमच्या वंशांत दिलेलं वचन मोडण्याचा प्रघात असेल तर तुमच्या सत्यप्रतिज्ञतेला शतशः धन्यवाद ! "

रुक्मांगदाचें हृदय कचरलें. पाऊल थबकलें. तिचे उपरोधिक वाग्बाण त्याच्या वर्मी झोंबले. खरोखर तो स्वतंत्र नव्हता. तिच्या आज्ञेला बांधला गेला होता. त्याला एकादशी व्रत मोडायचें नव्हतें अन् दिलेला शब्दहि. त्यानें विचारलें,

" बोल. तुला कोणती वस्तु दिली म्हणजे तूं मला वचनमुक्त करशील ? या भूलोकावरचं हवं तें माग. मग तें कितीहि दुर्जय वा दुर्लभ असूं दे ! "

मोहिनी या गोष्टीला तयारच होती. तिनें अशा वेळीं काय मागायचें तें आधींच ठरवून ठेवलें होतें. प्रश्नाचे शब्द हवेंत विरायच्या आंत ती बोलली,

" मला तुमच्या पुत्राचं शिरकमल द्या ! "

राजाचें रक्त गोठल्यासारखें झालें. स्वतःचें शिर मोहिनीनें मागितलें असतें तर क्षणाचाहि विलंब न लावतां तें तोडून त्यानें मोहिनीच्या पायांशीं टाकलें असतें. पण मुलाच्या प्राणांचा तो धनी नव्हता. त्यासाठीं त्याला मुलाचा अन् इतर माणसांचाहि विचार घेणें भाग होतें. प्रथम तो संध्यावळी राणीकडे गेला. कारण ती मुलाची आई होती. राजानें आपल्यापुढचा पेंचप्रसंग तिला सांगतांच तिचें मातृहृदय दुभंगलें. पण तिनें मायामोह आवरून सांगितलें कीं, ' पुत्राचं शिर द्या, पण व्रत मोडूं नका ! मला मुलगा झालाच नाहीं अन् मधला पुत्रसुखाचा काळ हें एक रम्य स्वप्न होतं असं मी समजेन.'

राजानें सुनेला पाचारण केलें आणि तोच प्रश्न विचारला. तिनेंहि शोकावेगाचे उमाळे गिळून म्हटलें, ' माझी तयारी आहे. मी तुमचं सत्त्वहरण होऊं देणार नाहीं. राजवंशाची प्रतिष्ठा राखण्याच्या कामीं त्यांचं जीवन कामीं येत असेल तर तें वैधव्य मी सौभाग्यापेक्षां मंगल मानीन ! '

सगळीं माणसें धर्मांगदाच्या जिवावर उदार झालीं. पण तो स्वतः आपल्या प्राणांवर तुळशीपत्र ठेवायला सिद्ध आहे का नाहीं त्यावरच पुढचें सगळें अवलंबून होतें. राजानें भीतभीतच त्याच्यापुढें प्रश्न टाकला. पण तोहि त्याच आईबापाच्या कुशींत जन्मलेला होता. तेंच रक्त त्याच्या अंगांत खेळत होतें.

"बाबा, तुम्ही असे खट्टू होऊं नका. अंगीकारलेल्या व्रतापुढें मला या मातीच्या गोळ्याची किंमत नाहीं. माझ्या मुंजींत तुम्ही 'मम व्रते हृदयं ते दधामि' हा मंत्र म्हणून माझ्या हृदयावर हात ठेवला होता तें मी विसरलों नाहीं. बापाला अधोगतीपासून बचावणं यांतच पुत्राचं पुत्रपण आहे. व्रतं अन् नेमधर्म हे आत्म्याच्या विकासासाठीं असतात. आत्मविकास हें साध्य अन् देह हें त्याचं सर्वांत मोठं साधन. आपण तुपाची धार अग्नींत ओततों. तिळा-तांदुळांचं हवन करतों. त्याचप्रमाणें आत्मतत्त्व उज्ज्वल राखण्यासाठीं देहाचाहि होम करायला माणसानं तयार झालं पाहिजे. हा उपदेश आईनं माझ्या मनावर ठसवला आहे अन् तो माझ्या वृत्तींत मुरला आहे. हा पहा मी आत्मदानासाठीं उभा आहें."

राजानें डोळे पुसले अन् पुत्राला हृदयाशीं कवटाळलें. सगळ्यांचें कसें एकचित्त, एकमत जमलें. कवयित्री सांगते—

**पहा चौघांचें कसें एक मन**
**मोहिनि बिचारी राहिली वेडी होऊन**

कुटुंबांत एकोपा नांदत असला कीं तिथलीं दुःखेंसुद्धां सुखरूप होतात. धन, वैभव अन् लौकिक पुरुषार्थ करून मिळवतां येईल; पण असला एकजीवपणा जन्मार्जित सुकृतानेंच मिळाला तर मिळायचा! नाहींतर चौघांचीं तोंडें चार दिशेला, असले प्रकार आहेतच घरोघरीं!

धर्मांगदानें मंगलस्नान केलें. वस्त्रालंकार अंगावर चढवले. एकवार ईश्वराचें मनोभावें स्मरण केलें. सर्वांचा निरोप घेतला. आईनें हातावर दह्याची कवडी ठेवली अन् म्हटलें, 'पुढच्या जन्मीं माझ्याच उदरीं ये बरं!' पत्नीनें त्याच्या चरणावर मस्तक ठेवून विनवलें, 'पाठोपाठ मलाहि बोलावणं धाडा हं!' राजाच्या पायां पडतांच तो म्हणाला, 'बाळा धर्मांगदा! तुझा बाप होऊन मी धन्य झालों!'

तो हंसतमुखानें मरणाला कवटाळण्यासाठीं पुढें उभा राहतांच मोहिनीचें तोंड पांढरें फटफटीत पडलें. देवांच्या राज्यांतसुद्धां असा त्याग, असें सत्त्वधैर्य तिनें पाहिलें नव्हतें. तिला तो प्रकार असह्य झाला. पण करते काय ?.ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें ती बांधली होती.

राजानें खड्ग उपसलें. हात उगारला. पुढच्याच क्षणाला काय घडणार होतें ? एक घाव अन्—

पण साक्षात् शंखचक्रधारी श्रीविष्णूनें पाठीमागें प्रगट होऊन राजाचा हात धरला. 'निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें । आणिक सांकडें पडों नेदी' याचा त्या सर्वांनीं अनुभव घेतला. श्रीहरीनं 'वर माग' म्हटलें अन् राजानें 'पदीं ठाव दे' एवढेंच मागणें मागितलें.

---

## रुक्मांगद आणि मोहिनी

आधीं नमन करूं देवा गणपती
साह्य होई ग तूं माते सरस्वती
चरण वंदितें कुळस्वामिया श्रीपति
एकादशी वर्णाया द्यावी मति
पुण्यपावन ही हो एकादशी
व्रत सांगितलें विष्णूनें इंद्रासी
त्यानें प्रगट केलें सकळ ऋषींसी
व्रत ठाऊक नव्हतें हो कोणासी
ब्रह्म, रुद्र थोर आनंद हो गाती
नाना वाद्यें शुभ वाजंत्रि वाजती
रंभा, मेनका त्या पुढें नृत्य करिती
सर्व देवांगना भावें ओवाळीती

नगरोनगरिंचीं पुष्पें जीं सरलीं
रुक्मांगदाच्या मळ्याची पाळी आली
फळें पुष्पें श्रृंगार वाडीचि चांगली
फुलें विमानीं त्यांनिं, घालूनियां नेलीं

× × ×

राव रुक्मांगद सकाळिं उठला
हाकारिलें माळियां समस्तांला
" आजि मळ्या जावया कां रे उशीर लागला ?
फुलें कोमल आणा उपरि भोगाला."
" आम्ही मळेया गेलों होतों चौघे जण
फुलें तोडुनी भार नेला उतरून
एकुण एक फुल नेलें हो चोरून "
ऐसें सांगती रायापाशीं ते येऊन
" दोन्ही चारी वेळां असे येउनी गेले
ते मी अन्याय तुमचे हो सोशीले
आजि चोर रे धरूनियां दिले
तरि तुम्ही माळी बहुत रे भले "
थोर कोपें आज्ञा केली सेवकांसी
" कोण नेमानं संवकला रे फुलांसी ?
तोहि धरुनि आणावा मजपासी
नाहीं तरी होईल अपाय जीवासी "
थोर कोपें राव बोलिला वचन
" आम्हांस नाहीं रे कोणाचा गुमान !

आज रात्रि चोर द्यावे उमगून
नातरि सकाळीं घेइन तुमचा प्राण!"
चिंताक्रांत घरिं बैसले जाऊन
आजि रायें योजिलें आम्हांसि मरण!

× × ×

इतक्या बोला माळी बैसले राखण
सभोंवतीं पहारा जो ठेवून
तीन प्रहर रात्र जी लोटली
एक म्हणती चोरवेळाहि टळली
मळ्यांत फार अंगिं हुडहुडि भरली
वृंतकाची त्यांनिं शेकोटि बा केली
पहांटेची उरली प्रहर रात्र
तेव्हां गंधर्व विमान घेउनी येत
तों ते सगळे नयनिं देखती
पहा विचित्र, काय दिसतें आकाशीं!
वृंतकधूर लागला विमानासी
तेणें दोषें विमान बैसलें भूमीसी
विमान बैसलें, सत्य कळलें मानसीं
मुख पालथें घालुनी निजलेती
कांहीं केल्या एक शब्द न बोलती
मुख दाविती ना तिथें आम्हांप्रती

× × ×

" तुमचें नांव ? " " आम्हीं स्वर्गीचे गंधर्व
आम्हांस फुलांसी धाडितो इंद्रराव
तोहि नित्यांनीं पूजितो विष्णु देव
त्याचें नांव जरि प्रसिद्ध केशव "
" तुम्हि बरे पुण्यशीळ हो दिसतां
चौर्यकर्म कासया आचरितां ?
एकाचें काढुनी एकासि हो देतां
त्यांत तुम्हां काय होईल साध्यता ? "
गंधर्व म्हणती, " आम्हि विष्णूचे हो दूत
त्याचे आज्ञेप्रमाण वर्तत
तो सांगतो तीतुकें आइकतों
पापपुण्य आम्हां नाहीं हो लागत "
" कांहीं पुण्य हवें या विमानासी
याचि आज्ञा करा मज सेवकासी
जोडली जोड मी अर्पीन तुम्हांसी
ती मजला पुढें येईल कामासी !
लक्ष गाई मी, गोधनें देईन
परि तुमचें वरि चढूं द्या विमान
हत्तिघोड्यांच्या पागा मी देईन
परि तुमचें वरि चढूं द्या विमान."
गंधर्व म्हणती, " एवढें कां बोलसी
याग होम तूं बहूत केलेसी
मेरुप्राय सोनें तूं वांटिलेंसी

नये तुलना एके हो एकादशी ''
''.ऐशि काय असते एकादशी ?
ती तर ठाउक नाहीं इथल्या लोकांसी
शास्त्रयुक्त मीं पुसतों तुम्हांसी
जागृत होउनी नीट सांगावि आम्हांसी.''

× × ×

गंधर्व म्हणती, '' आईक सांगतों.
दशमी दिवशीं अळणी ताकभात
पंगतीसी घेउनीयां अतिथ
दंत शोधुनी तुळस घालावि मुखांत.
दुसरे दिवशीं निराहार उपोषण
प्रातःकाळीं करावें गंगास्नान
बरें करावें देवतांचें अर्चन
रात्रिं हरिकथा, करावें जाग्रण.
बारा ब्राह्मण सांगावे द्वादशीसी
बारा सूर्य येतिल त्या दिवशीं
पंचामृती भोजन अर्पावें विप्रांसी
विडे दक्षिणा देउन बोळवावें त्यांसी
ज्यासि घडेना गंगेचें शीतस्नान
त्यानें करावें उष्ण उदकेंकरून
ज्यासि घडेना हरिकथा हें जाग्रण
त्यानें दिवसां तरि करावें स्मरण
बारा ब्राह्मण सांगावे द्वादशीला

नसल्या अंतीं तरि सांगावें एकाला
ग्रासामधिला ग्रास अतीथासी द्यावा
नाहींतर गाइला गोग्रास चारावा
फळें पुष्पें तो भगवंत अर्चावा
संचितार्थे कृपणपणा न करावा."

× × ×

रायें व्रत हो धरिलें मनासी
म्हणे, 'डांगोरा पिटा अवघ्या लोकांसी'
दूर नगरांत डांगोरा पीटीती
'कोण उपवासी ?' म्हणून पुसती
विश्व जन हे जेविले म्हणती
ऐसें येउनी रायापाशीं हो सांगती
नगरांत एक होती परीटीण
सास्वासुनांचें जाहलेंसे हो भांडण
रागें त्यांनीं नाहीं भक्षियेलें अन्न
भांडत केलें चार प्रहर जाग्रण
राव म्हणतो, 'झालें हरीचें स्मरण
अनायासें घडलें एकादशी पुण्य'
तें कळतां रायासी वर्तमान
रायें पाठविलें छत्र सुखासन
छत्र सुखासन आले परटीणिद्वारासी
'तुम्हांस रायाचा ग अभय !' म्हणती

छत्र सुखासनीं बसविलें त्या दोघींसी
आणुनि उभ्या केल्या त्या रायापाशीं
त्यांच्याकडुनी करविलें गंगास्नान
वस्त्र अलंकार भूषणें देऊन
धार ओतिती त्या सासू आणि सून
त्यांच्या पुण्यें वर चढलें विमान.

× × ×

रायें व्रत हो धरिलें मनासी
म्हणे, 'डांगोरा पिटा अवघ्या लोकांसी'
एकादशिचें व्रत न कोणि जो करी,
त्यासि घालविलें नगराबाहेरी
यमपुरी अवघी पडली ओस
तेव्हां थोर क्रोध आला हो यमास
धांवत आला विष्णूच्या सभेस
"तूं आम्हां इथें कशा ठेविलेंस?"
शिक्का काढुनी टाकिला ब्रह्मयापाशीं
"आहे एवढ्याचा तूं वकील झालासी
यमयातना मीं रे सांगावि कोणासी?
देई निरोप बा जाऊं दे, आम्हांसी!"
तोहि विचार पाडिला अवघ्यांसी
ब्रह्मदेवें पाचारिलें मोहीनीसी
"मोहिनि! तूं जाई मानवलोकासी

व्रत भंगवी रायाची एकादशी
जर तो न मोडी एकादशी व्रत
तरि तुजला नेइन निमिषांत
राव मनीं थोर होईल दुःखित
पुत्रशिर तूं मागे ग त्वरित."

× × ×

स्वर्गावरुनी उतरलीसे मोहिनी
हातीं मोहनमाळ जी घेऊनी
वृंदावनीं बैसली अनुष्ठानीं
रायें देखिली अवचित नयनीं
राव पुसे, ' तूं कोणाची ग कोण ?
एवढी सुंदर तूं कोणाची कामीन ? '
मोहनी म्हणे, " मी आहें रे तापसी
योग्य भ्रतार पाहतें आपणासी.
जो मन देईल माझेया वचनासी,
माळ घालुनि पति करीन मी त्यासी."
" तुझें वचन मी ग हें पाळीन
तुझे आज्ञेप्रमाण वर्तेन.
तूं सांगशिल तीतुकें आइकेन
पति करिं ग मज माळ ही घालून "
" दूरवेरीं पहा भला रे विवेक
नाहीं तर तुजला हांसती जनलोक "

रायें भाक दीवली मोहिनीसी
तिनं माळ घातली राजेयासी.

× × ×

मोहिनी पुसे, " तूंमचें व्रत कोण ?
तुम्हां काय या राज्याचें कारण ? "
शिक्का काढुनी प्रधानासी जी देऊन
तुम्हिं असावें सुख उपर भोगून "
राव मोहिनीसह माळीवरी गेला
मोहन घालुनी तो कसा भुलविला
बहुतां काळीं तो उन्मत्त हो जाला
एकादशिचें व्रत विसरला
बहुतां काळीं तो जागृत हो जाला
डांगोऱ्याचा शब्द श्रवणीं पडला
' मीं रे व्रत हें धरिलें मनासी
उपराठें काय झालें रे मजसी
रायें उडी टाकिली माळीखालीं
त्याच्यासवें मोहिनी ती हो आली
तिनं रायाच्या धरिलें हातासी
" भाक देउनी तूं कुठें रे जातोसी ? "
राव म्हणे, " आजि ग एकादशी
व्रत गंधर्वीं कथिलें आम्हांसी "
मोहिनी म्हणे, " मी आलें स्वर्गांतूनि

व्रत देखिलें नाहिं शास्त्रांत, पुराणीं
उपास पारणीं करावीं बैराग्यांनीं
राजसूय करावे राजेयांनीं."
राव म्हणे, " आज ग उपोषण
ग्रासमात्र नाहीं भक्षीत ग अन्न.
माझा गेला तरि जाऊं द्यावा प्राण
तुझ्या योगें भंगलें माझें पुण्य ! "
थोर क्रोध आला त्या मोहिनीसी,
" आतां उदार होई पुत्राच्या शिरासी."
रायें पाचारिली संध्यावळी राणी
म्हणे, " ऐकें, काय म्हणते मोहिनी
पुत्राचें शिर द्यावें हो तोडूनी
नाहीं तर मोडीं म्हणते हरिदिनी."
" तुम्हीं एकादशी व्रत न मोडावें
पुत्रशिर मोहिनीसी द्यावें."
रायें पाचारिलें धर्मांगद या पुत्रासी .
" कसा विचार येतो तुझेया चित्तासी ? "
" तुम्हि एकादशी व्रत न मोडावें
माझें शिर मोहीनिसी द्यावें "
रायें पाचारिलें धर्मांगदाच्या नारीसी
" कसा विचार येतो तुझेया चित्तासी ? "
ती म्हणे, " एके वेळे जाईल हा प्राण,

नाहीं चुकलें या जन्माचें मरण !
तुम्हि एकादशी व्रत न मोडावें
शिर देउनी सत्त्व तुम्हीं हो राखावें."
हरिश्चंद्रें डोंबाघरीं पाणी वाहिलें
तरि आपुलें सत्त्व नाहीं जाऊं दिलें
पहा चौघांचें कसें एक मन
मोहिनी बिचारी राहिली वेडी होउन
रायें पुत्रासी घेतला मांडीवरी
शस्त्र उगारिलें उजविये करीं
शंखचक्र आणि पितांबरधारी
हात तोही धरी वरचेवरी
" झालों प्रसन्न म्हणे मी मुरारी
काय मागशिल तें मागें झडकरी "
" शेषशयन किती आहे दूर
चरणापाशीं ठेवीं मला निरंतर ! "
त्यानें आणिलें पुष्पक विमान
आंत बैसविलीं तीं हो चौघे जणं
तें कळलं लोकांसी वर्तमान
सकळ नगरी आली असे हो धांवून
" आमच्याकडून करविली एकादशी
आम्हां टाकुनी तूं कुठें रे जातोसी ?
शेषशयन सांगतो रायापाशीं

" आंत बैसवा अवघ्या लोकांसीं "
नगरासहित राव विमानिं बैसला
ध्वज लावुनी तो वैकुंठासी गेला
केशवस्वामी नांदतो हृषीकेशी
त्यांनीं सकळ नगरी नेली वैकुंठासी
तिहीं लोकीं पुरुषार्थ हो केला
धन्य मायेकुशीं राया उपजला !
हिकडे मोहिनी बैसली वेडी होउनी
" मला तुम्हीं स्वर्गिं न्यावें उद्धरुनी "
" एकादशी व्रत कुणी जे करिती
द्वादशीचे दिवशीं जेउनि नीजती
त्यांचे पाय चाटुनी पुण्य घ्यावें
मग तुम्हीं स्वर्गिं उद्धरुनी यावें "

# चिंधी

## [ कथासूत्र व परिचय ]

एके दिवशीं नारद मुनि अचानक द्वारकेंत आले. देव-भक्तांचा संगम झाला. आनंदकल्लोळ उसळला. पण कसल्याहि हर्षोल्लासाच्या प्रसंगीं कांहीं तरी कुस्पट काढलें नाहीं तर तो नारद कसला! बोलतां बोलतां त्यानें देवावर आरोप केला कीं, "तूं कपटी आहेस. पक्षपाती आहेस. सुभद्रा तुझी सख्खी बहीण; पण तिचं कोडकौतुक करायचं सोडून तूं द्रौपदीलाच विकला आहेस. तिची आळी पुरवण्यासाठीं तूं जीव टाकतोस. बिचाऱ्या सुभद्रेला मात्र तुझ्या अंतरांत तिळाएवढी सुद्धां जागा नाहीं. 'असेल तें विटवा अन् नसेल तें भेटावा' अशी तुझी रीत. मला नाहीं हें आवडत."

लीलानाटकी भगवंतानें त्यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो नुसता हंसला अन् निराळयाच विषयावर बोलूं लागला. सहज म्हणून त्यानें जवळची एक चोयटी हातांत घेतली होती. तिनें त्याचें बोट कापलें. कापल्या जागीं रक्त वाहूं लागतांच 'प्रथमोपचार' करण्याची वेळ आली. देव त्या रुधिरधारेकडे पाहून म्हणाले, 'नारदा, जा. सुभद्रेकडून बोट बांधायला एखादी चिंधी घेऊन ये.' नारद सुभद्रेच्या महालाकडे जातांना मनाशीं म्हणाला, 'बोटावर बेतलें तेव्हां सुभद्रेची आठवण झाली काय?'

नारद घाबरल्या मुद्रेनें आलेला पाहून सुभद्रा म्हणाली. "देवर्षे! काय प्रकार आहे? चर्या कां उतरली तुमची?"

"अग, काय सांगूं? तुझ्या बंधुराजांनीं खेळ करतां करता बोट कापून घेतलं आहे. लवकर एखादी चिंधी दे."

सुभद्रा म्हणाली, 'आतां काय करूं? चिंधी कुठें सांपडायची!' तिनें आपलीं बासनें घाईघाईनें उलगडलीं. वरच 'गावळगुजरी' साडी दिसली. तिनें विचार केला, 'ही कशी फाडायची?' तिच्या खाली होती 'कुसरीची

चंद्रकळा.' 'छेः! ही कशी फाडूं?' तिच्याखालीं 'सोनसळा.' त्याखालीं हिरवी 'शेलारी.' 'छेः, यांच्या का धांदोट्या करायच्या?'

नारद बोलला, 'अग वेळ काय लावतेस? एवढ्यांत देवाच्या बोटांतून कमंडलूभर रक्त सांडलं असेल. आटप लवकर.'

अखेर सगळें विसकटून सुभद्रा आंबट तोंडानें म्हणाली, 'नारदा, चिंधी नाहीं रे मजजवळ!'

नारद हिरमुसला होऊन तसाच द्रौपदीकडे धांवला. तेंच वर्तमान तिलाहि सांगितलें. द्रौपदी नवी लप्फेबाज पैठणी नेसून बसली होती. टर्रकन् तिनें पदर फाडला अन् चिंधी नारदाच्या हातीं देऊन म्हटलें,

"देवर्षे! पळा लौकर, आधीं दादाचं बोट बांधा. ही मी आलेंच."

ती वीतभर चिंधी! पण नारदानें थोड्याच वेळापूर्वी सुभद्रेचा जो कैंपक्ष घेतला त्यावर तिनें सारवण घातलें. 'देवाला सुद्धां मी चार गोष्टी सुनावूं शकतों' या त्याच्या अभिमानाची नांगी पडली. तो चिंधी घेऊन देवाजवळ येतो तों काय? ना रक्त ना घाव! देवाचें बोट मुळीं कापलेंच नव्हतें. देवानें ती चिंधी मस्तकीं धारण केली अन् तो विजयी मुद्रेनें हंसला.

"नारदा! मिळालं तुला उत्तर? मी सर्वांभूतीं समान आहें. 'न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः' पण भक्त मला भावबळानें खेचून घेतात, अन् घरींदारीं राबवतात, त्याला मी काय करूं?—'

पण या बाबतींत अधिक कांहीं लिहिण्यापेक्षां ज्ञानेश्वरमाउलीच्या दोन तीन ओव्याच उद्धृत केल्यानें काम चोख होईल.

**तो मी पुससी कैसा। तरी जो सर्वभूतीं सदा सरिसा**
**जेथ आपपर ऐसा। भागु नाहीं॥**

**जे ऐसिया मातें जाणोनी। अहंकाराचा कुरुठा मोडोनी**
**जे जीवें कर्में करूनी। मातें भजले॥**

**ते वर्तत दिसती देहीं। परी ते देहीं ना माझ्या ठायीं**
**आणि मी तयांच्या हृदयीं। समग्र असें॥**

---

# चिंधी

वंदितें मी चिंतामणि, द्वारकेंत नारदमुनि, द्वादशटीका रेखुनी। स्कंधीं ब्रह्मविणा घेउनी। नारायण नामस्मरणीं। पातले हो श्रीहरिसदनीं। पहातांचि ब्रह्मनंदन। आलिंगिती मधुसूदन। सन्मानें आसनिं बसवून। कांहीं वदा म्हणाति तत्त्वता ॥ १ ॥

सुभद्रा म्हणे रे अच्युता। द्रौपदिवर कां तुझी ममता ॥ ध्रु० ॥

नारद वदे हृषीकेशी। बहु कपटी तूं मज दिससी। सुभद्रा बहीण तुझी खाशी। द्रौपदिच्या धांवण्या पळसी। कधिं तिजसी न बोलसी गोष्टी। द्रौपदिघरीं काढिसी उष्टीं। समचित्त म्हणसी परमेष्ठी। मग समान नसे का चित्ता ॥ २ ॥

हरिनें हो कौतुक केलें। चोयटीनें बोट चिरियेलें। बदबदां रक्त चालीलें। शरणागत धरणी लोळे। घाबरा मुनी तो बोले। नेत्रासी जीवन लाविलें। नारदा सुभद्रासदनीं। एक चिंधि आण भिजवोनी। झडकरी बांधवा मुनि। जिव व्याकुळ होतो आतां ॥ ३ ॥

तेथूनि ब्रह्मनंदन। पातले सुभद्रासदनीं। या बैसा बोलते वाणी। काय वदूं वर्तली करणी। अवचित बोट चिरोनी। तव बंधु व्याकुळ धरणी। झडकरी उठ गे बाई। बांधाया चिंधी देई। घाबरले शेषशायी। कसं करूं म्हणे ती आतां ॥ ४ ॥

फाशि फाडूं गावळ गुजरी। नवी चंद्रकळा कुसरी। कसें फाडूं बहिणपुरी। सोनसळा हिरवी शेलारी। नाना परीचे दिंड सोडिले। नारदासी दाखविले। नाहीं चिंधी म्हणून बोल्लिें। शपथ तुझी रे अनंता ॥ ५ ॥

ऐकोनि ब्रह्मनंदन । पातले द्रौपदीसदन । या बैसा बोलती वदन । नवें नेसुन बसली वसन । सुखी पुसे कीं मधुसूदन । बोट चिरुनी व्याकुळ प्राण । माउलीचें बोट कां चिरिलें । भरजरी पदर फाडिले । मुनिवरा बांध जा वदिलें । आधी कृष्णनाथा ॥ ६ ॥

नारदा वदे यदुपति । समसमान मी या जगतीं । जे भावें मजसि आळविती । दिनानिशीं वसे त्यां चित्तीं । मी भक्ताधीन या जगतीं । मुनिवरा पहावी प्रचिती । गंगेचें निर्मळ पाणी । रंगामध्यें मिश्रित वर्णी । लवणामध्यें खारट पाणी । शर्करेंत गोड होई मिळतां ॥ ७ ॥

---

# सतीचा अध्याय

## [ कथासूत्र व परिचय ]

महाराष्ट्रांत गुरुचरित्र सर्वांना परिचित आहे. तो प्रासादिक ग्रंथ समजला जातो. दत्तगुरूंच्या कृपाप्रसादासाठीं अनेक भक्त त्याचें नित्य पठण करतात. संकटनिरसन आणि अभीष्टप्राप्ति यांच्यासाठीं त्याचा सप्ताहहि वाचतात. पंधराव्या शतकाच्या मध्याला हा ग्रंथ सरस्वती गंगाधरानें लिहिला. हा लेखक नृसिंहसरस्वतींच्या गुरुपरंपरेंतला होता.

मुसलमानी रियासतीच्या ऐन भरभराटींत श्रीदत्त नृसिंहसरस्वतींच्या रूपानें अवतरले. स्वतः आचरून आणि उपदेशून त्यांनीं वैदिक धर्माचें संरक्षण केलें. चातुर्वर्ण्याची सुटलेली गांठ पुनश्च आवळावी असा ब्रीदाचा तोडर बांधला. स्त्री-पुरुषांच्या आचारधर्माला आलेला मलिनपणा धुऊन काढला. सहस्रावधि लोकांना दुःखमुक्त केलें. हिंदूंवरच नव्हे तर मुसलमानांवरहि आपल्या तपस्येची अन् योगैश्वर्याची प्रभा पाडली. गाणगापूर हें महाक्षेत्र बनवून लोकांचा तिकडे ओढा वळवला. ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांच्या मधील काळांतले महापुरुष म्हणजे नृसिंहसरस्वती.

गुरुचरित्रांत नृसिंहसरस्वतींचें समग्र लीलाचरित्र असून शिवाय प्रसंगप्राप्त अनेक कथाहि आहेत. त्या सर्व कथांत एका सतीची कथा ही अत्यंत करुणोदात्त अशी आहे. त्या ग्रंथांतले तीस ते बत्तीस असे तीन अध्याय त्या कथेनें रंगले आहेत आणि कोण्या बाळकृष्ण नांवाच्या कवीला ती कथा गाण्याची स्फूर्ति होऊन त्यानें हें प्रस्तुतचें कवित्व रचलें आहे.

जुन्या संस्कृतींत वाढलेल्या माय-बहिणींच्या आवडत्या गाण्यांपैकीं हें एक आहे. मन रमवण्यासाठीं नव्हे; तर एक उपासना म्हणून त्या याचें पठन करतात. आपलें अहेवपण चिरंजीव व्हावें हा उद्देश त्या पठनाच्या मुळाशीं असतो. गाण्याच्या शेवटीं कवीनें जी फलश्रुति सांगितली आहे तिच्याकडे त्यांचें लक्ष असतें. हें गाणें म्हणण्याची चालसुद्धां कोंकणांत अन् देशावर एकच आहे आणि ती इतकी हृदयावर 'असर' टाकणारी आहे कीं, राते-

विलाप गाणाऱ्या कालिदासाचें 'वियोगिनी' वृत्तच. या काव्याची रचना सामान्य आणि शिथिलच आहे. पण तें म्हणण्याची धाटणी, बायकांचा स्वभावमधुर आवाज अन् त्यामागचा पवित्र भाव अशा तीन गुणांनीं जणुं या काव्यांत 'त्रिगुणात्मक त्रयमूर्ति' दत्तच अवतरतो. याचें कथानक थोडक्यांत असें आहे—

माहुरांत एका दांपत्याला बरींच मुलें झालीं अन् गेलीं. शेवटीं दत्ताच्या आराधनेनें म्हातारपणीं एक मुलगा जगला. अपार माया-ममतेनें त्यांनीं त्याचें संगोपन केलें. मुंज झाल्यावर त्याला साक्षेपानें विद्या शिकवली. बाल्यदशा माघारते न माघारते तोंच कौतुकानें त्याचें लग्न केलें. मनाजोगती सून आणली.

समवयाचें जोडपें. दोघें सुंदर, सुलक्षण. एकावर एकाचा प्राण. आईबापांच्या आज्ञेंत राहून तीं प्रेमसुख भोगीत. पातिव्रत्याचे नियम कांटेकोर पाळणारी ती मुलगी सती म्हणून गांवांत प्रसिद्धि पावली. कांहीं दिवस असे आनंदांत गेल्यावर तिच्या पतीला अन्नद्वेष झाला. त्याच्यावरच्या प्रेमामुळें सतीनेंहि आपलें अन्न तोडलें. पति कडू औषधें घेतो म्हणून तीहि कडू खाऊं लागली. त्याच्या संगें तीहि दुखणाईत दिसूं लागली. धृतराष्ट्र आंधळा म्हणून गांधारीनेंहि आपले डोळे बांधून घेतले हा आदर्श तिच्या डोळ्यांपुढें होता.

पण औषधांनीं त्याचें दुखणें कमी व्हायच्याऐवजीं तें वाढलें अन् क्षयावर गेलें. सतीनें शुश्रूषेसाठीं पदर बांधला. ती अहोरात्र त्याच्या उशा-पायथ्याशीं राहूं लागली. 'दुर्गंधी झाला देह त्याचा। जवळी न ये वैद्य साचा' पण ती कंटाळली नाहीं. अनेक भस्में, रसायनें त्याला पाजलीं. ब्राह्मण अनुष्ठानाला बसवले. पण शेवटीं वैद्यांनीं सांगितलें कीं, 'मनुष्यप्रयत्न नव्हे आतां!'

आईबाप घळघळां रडूं लागले. मुलानें परमार्थ सांगून त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण मुलगा म्हणजे काय घरांतली कीडमुंगी का? कसें काळीज सांवरून धरावें त्यांनीं! शेवटीं सतीनें त्याला घेऊन गाणगापुरीं जाण्याचा निश्चय केला. सासू म्हणाली, 'जा बाई, तुझ्या दैवानं तरी माझा मुलगा जगो!'

त्या आसन्नमरण रोग्याला डोलींत घालून ती गाणगापूरला आली. मुक्कामाला येऊन डोलीवरचें आच्छादन दूर करून पाहते तों पति गतप्राण! जीवनांतल्या समईतलें तेल संपलें अन् ज्योत विझली.

तिनें आकात मांडला. अशा क्षीण अवस्थेंत प्रवास घडवून मीच पतीच्या मृत्यूला कारण झालें अन् 'माता-पितयांस त्यजून । घेऊन आल्यें विदेशीं' म्हणून ती ऊर पिटूं लागली. गांवातल्या नरनारी तिच्याभोंवतीं जमा झाल्या. लोक पुढच्या तयारीला लागलेले पाहून ती मृत पतीला कवटाळून बसली.

इतक्यांत एक भस्म-रुद्राक्षधारी यति तिथें प्रगटला. त्यानें तिला वेदान्ताचा उपदेश केला. धीर असेल तर सहगमन कर, नसल्यास असे असे विधवाधर्म आचरून परमार्थ साध, म्हणून तिला कांहीं नेमनिष्ठा सांगितली. ती सहगमन करायला तयार झाली. सतीचीं वाणें वांटीत वांटीत ती चितेवर चढायला निघाली. पण एकाएकीं तिला एका गोष्टीची आठवण झाली.

ती आपल्या पतीला घेऊन नृसिंहसरस्वतींच्या सेवेसाठीं आली होती. पण मुक्काम गांठण्यापूर्वीच सगळें प्रकरण आटोपल्यामुळें ती गोष्ट तशीच राहून गेली. तेव्हां आतां आगींत उडी घेण्यापूर्वीं एकवार त्यांचें दर्शन घेऊन आशीर्वाद मागावा म्हणून ती स्वामींकडे गेली. नमस्कार करतांच स्वामी आशीर्वाद बोलले, 'सौभाग्यवती पुत्रवती भव!'

सती मंदस्मित करून म्हणाली, 'हें सारं आतां पुढच्या जन्मीं!'

असें कां बोलतेस म्हणून विचारतांच तिनें घडला वृत्तान्त सांगितला. नृसिंहसरस्वती म्हणाले, "माझा आशीर्वाद खोटा होणार नाहीं. तूं जा आपल्या पतीकडे अन् साक्षात्कार पहा."

सती धांवतच स्मशानभूमीकडे आली. पतीचा मृतदेह सरणावर ठेवला होता. तो आणून स्वामींच्या पुढें ठेवला. त्यांनीं त्यावर तीर्थंजल शिंपडलें. त्याच्यांत हालचाल सुरू झाली. तो उठून बसला. जणुं झोंपेंतूनच जागा झाला आहे. त्याचा मृत्युच नव्हे, तर रोगहि दूर झाला होता. सती आनंदानें फुलली. हर्षाच्या लाटा तिच्या डोक्यावरून गेल्या. दोघांनीं नृसिंहसरस्वतींचे पाय धरले.

असें आहे हें निजनिष्ठेचें गाणें. याचा शेवट गोड झाला आहे. शेवटीं गोड तें सगळेंच गोड! या गाण्यांत अन् कथेंत जो सतीधर्माचा आदर्श उभा केला आहे तो आजचा स्त्रीसमाज मानायला तयार होणार नाहीं. आजची नारी नवरा औषध घेतो म्हणून आपण घेणार नाहीं. त्याला अन्न-द्वेष झाला म्हणून स्वतःचा आहार कमी करणार नाहीं. आजचा युगधर्म

बदलला आहे. त्या काळीं स्त्रियांचें ध्येय आणि कर्तव्य पति आणि कुटुंब एवढ्यापुरतेंच मर्यादित होतें. आज त्यांचें क्षितिज विस्तारलें आहे. दृष्टि फांकली आहे. राजकारण, समाजकारण, इत्यादि अनेक 'कारणें' स्त्रीच्या युक्तिबुद्धींना आवाहन करूं लागलीं आहेत. एकेकाळची अबला आज शक्तिशालिनी बनून पुरुषाच्या बरोबरीनें सर्व क्षेत्रें पादाक्रांत करूं पाहत आहे. ती हें गाणें ऐकून म्हणेल कीं, 'असल्या भाबड्या, रडक्या अन् आत्मघातकी पातिव्रत्याचीं पुराणें आम्हांला सांगूं नका.'

पण याच गाण्यांतून आजच्या स्त्रियांनाहि एक गोष्ट घेतां येण्यासारखी आहे अन् ती म्हणजे निष्ठा. त्या सतीची निष्ठा केवढी जबरदस्त आहे ! त्या निष्ठेचेंच गोड फळ शेवटीं तिला मिळालें. जें ध्येय म्हणून ठरवलें, कर्तव्य म्हणून अंगीकारलें, त्याच्या पूर्ततेसाठीं पडेल ती देहदंडना सोसणें अन् प्रसंगीं पंचप्राणहि ओवाळून टाकायला तयार होणें या गोष्टी निष्ठेवांचून संभवत नाहींत. निष्ठा ही कोणत्याहि युगांत आदरणीय आहे. निष्ठेनेंच भक्तीला मोल चढतें. निष्ठेनेंच प्रीतिहि धन्य होते. तुकोबा याचसाठीं म्हणाले आहेत कीं—

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म !**

---

## सतीचा अध्याय

पूर्वे सिद्ध सद्गुरुशीं विनवी शिष्या कर जोडुनी  
म्हणे सांगावी पुढील कथा पुसतों भीड सोडुनी  
ऐक म्हणे सद्गुरु नामधारका, कर्ण उघडुन  
त्रिगुणात्मक अवतार गाणगापुरिं हे पाहति जन  
नृसिंह सरस्वती नाम प्रख्यात ऐका ही खूण  
त्यांनीं ठायींच्या ठायीं ठेविले काळादिक मोहुन

गलितकुष्ठ दर्शनें जयाचे जाती सर्व रोगही
नयन पावले बधिर नेत्र कर्ण सर्वही
वांझ स्त्रियेशीं दुहिता पुत्र लाभला मनिं सर्वही
बादशहा कृपेनें रजक मिरविला बरा
फुटति शुष्क वृक्षासि पल्लव शिरा
पांगूळ चालले भक्तहि देशांतरा
अशि कीर्ति उमजली उपकारा महिवरती
ऐकोनि देशदेशिंचे येतिल जन सारे
किती रोगरहित जाहले
कितिक उद्धरती किति समीप येउन राहती
असं असतांच माहुरांत उत्तर देशीं
होते गोपिनाथ प्रधानिक नाम बरवं
त्याची स्त्री प्रसवतांची मृत्यूसि जाति बाळ
केले यज्ञयाग बहु हो चुकेना कदा काळ
अशा परी दिवस गेले दुःखासि त्यासि भाळ
केले देव देवऋषि परि चुकेना जंजाळ
मग आराविलें दत्ता चरणीं ठेवुनि भाळ
लाभली पुत्ररत्न शोभविली वेल्हाळ
करुनि बारसें दिसेंदिस पुत्र वाढे कौतुकीं
प्राणपणें रक्षिती जयांनीं दिलि काळाला ढकी १
श्रीपाद श्रीवल्लभ ज्याचें नाम स्मरतां मुखीं
जाती भवसागरीं तरुनिया ते नर होउनि सुखी ॥ ध्रु० ॥

फार दिवस पुत्रास सतीनें दुग्धपान करविलें
वृद्धपणीं पुत्रवान् ऐसें मनिं अपुल्या ठरविलें
घेऊनी मांडीवर सदोदित बाळाशीं भरविलें
होतां वर्षें पांच चांगलीं व्रतबंधन करविलें
बारा वर्षें लोटतां करुनि लग्न यश मिरविलें
पाहुनी स्नुषा-पुत्रासि जयांनीं गोड कौतुक मिरविलें
समवयासारखीं उभयतां होतीं बरीं
वडिलांचि आज्ञा पाळिती कधीं न जाती दुरी
सर्वदा विलासामधिं आपुल्या मंदिरीं
तेव्हां अकस्मात पुत्रासी रोग लागला
झाली घाबरी म्हणे दोष मागला
पूजितां नाहीं कां परमेश्वर जागला
ऐकोनि पतीची व्याप्ति सतीला हो भारी
त्यागिलें विलासा वरि आपुलीं सौख्यें सारीं
उंच वस्त्रादि अलंकार
राहिना दूर सखयाचें लागलें पिसें
लागली रोग चिंता सखयाची कीर सतीला
केला निश्चय बळकट तिनें आपल्या शुद्ध मतीला
मग आराधिलें दत्ता गेली शरण यतीला
शरीरासी दुर्गंधी सुटल्या फार पतीला
राहिना दूर क्षण ती चुकेना तीळ रितीला
दिवसेंदिवस लेश तयाच्या पडूं देईना चुकी

पतिव्रतेनें व्रत चालविलें करिं झेलुनियां थुकी २
बोलाविले वैद्य दिलीं औषधें नानापरिंचीं तया
घातिले ब्राह्मण अनुष्ठानासि रोग जावया
परि अजुनी गुण येईना कशी ईश्वरा येईना दया
लहान वयामधें कसे कष्ट आणिले माझिया प्रिया
क्षीण होतां पति शरीराची गेली माझ्या रया
पडेल उतार पतिसी आहे शुद्ध पंथ न्यावया
पतिसवें औषधें घेतसे सती आपण
जें भक्षितो सखा तें भक्षी प्रीतिनं
जन म्हणति धन्य राहिली अशा रीतीनं
एके दिवशीं पिता जननी म्हणे तया लागी
केला होता भरवंसा तुझा रे आम्हीं दोघे
जगण्याचि भ्रांत वाटते तुझिया रोगें
तूं आम्हां दोघां वृद्धां टाकुनियां जासी
देऊं प्राण तुजविण रे आम्ही एव्हां
आमुची निराशा केली ईश्वरा कैशी
करी शोक असा धरणी पडलीं जेव्हां
मग तयांसि सावध करुनी विनवी सुत
या हातीं नाहीं घडली तुमची सेवा
स्वाधीन काय माझ्या या मरणाची करणी
निरुपाय गोष्ट झाली लागलों वृद्धचरणीं
येति लोटावरि लोट रुदनाच्या फार भरणीं

नानापरि संबोखुनि केलिया शोकरहित कौतुकीं
कर जोडोनी विनवी उभि सन्मुख केतकी ३
एके दिवशीं आपुली कांता करीं निकट धरून
म्हणे सांगतों ऐक शेवटची अंतरिंची खूण
शत वर्षें लोटलीं समीप आलं माझं मरण
तूं जाई ग माहेरीं कीं श्रीहरिला शरण
झाली तुटातूट आतां मनीं आशा राहिली तुजवीण
गेलों काळाच्या मुखीं अशी सुंदर कांता मी सोडुन
आम्ही अभागी दैवहीन कळलं पुरतं मानसीं
रत्न जसं काकास पचेना झाली माझी गति तशी
मुखचंद्राच्या वरुनि काय ओवाळुं जैशी दशी
दिलं दुःखचि तुज जन्मापासुनि आम्ही
मागील जन्मिचं वैर साधिलं ग ! मी
नाहीं पुरली आशा तुझिया संसाराची
शेवटीं ग झालों तुजसंगें अंतर वैरी
ऐकोनि तिनें हो पतिच्या वचनासी
जाईल जरी सूर्य पश्चिमेसी उगवाया
परी न जाई कुलिनाची कुमरी
ऐकोनि शोक ऐसा वृद्धें पडती धरणी
ह्यावरी अंतर देती प्राणासी घात करुनी
राहीन निकट ऐशी दासी मी चाकरीण
क्षणोक्षणीं मजला बोलतां वचन

तुम्हि छत्र शिरीं असतां मजकडे बघिल कोण
त्रिभुवन ठेंगणें मानितें तुम्हांवरून
ऐसा निश्चय केला तिनें आपुल्या मती
कर जोडोनी उभयतांना विनवी ईश्वर सती ४
दोन्ही कर जोडुनी विनवी सासुसासऱ्यांस सून लाडकी
म्हणे मागणें मागतें द्या आज्ञा गोड कीं
क्षीण प्रकृती झाली पतीची क्षयरोगें रोडकी
त्यांसी तरावया जागा योजिली जहाज नव्हे; होडकी
नृसिंहसरस्वती ह्यांची फांकली कीर्ती लौकिकीं
वसती गाणगापुरासि जाऊन घेऊं त्यांचें दर्शन
करितील स्वामी करुणाधिपती संकटनिरसन
प्राप्त नव्हे तो शिव विरिंची आणि संकर्षण
द्या मज स्वामी आज्ञा लौकर आतां
ही युक्त बोलते आलं तयांच्या चित्ता
जाणोनि आज्ञा दिली तीसी अवचिता
सासु म्हणे राहील तरी राहो तुझिया दैवें
वांचो पुत्र करीं चिरंजीव ऐसा
तत्काल निघाली पतिसी करुनियां डोली
बरोबर घेतलीं बहुत दासि माणसें
पावली गाणगापुरासी जाउनी मग ती
मनिं म्हणे स्वामिचं दर्शन होईल कैसं
मग उघडून डोली घाबरून बघे गोरी

तेव्हां अकस्मात् पतिची तुटली आयुष्यदोरी
करिं ऊर पिटुन घेई पडली शरिरावरी
तेव्हां अकस्मात् तेथें योगीराज क्षणभरी
पाहूनि विलापातें देखिली दुरून नारी
ऐकोनि शोक ऐसा ठाकली उभी स्वारी
तूं कोणाची कोण कां शोक करिसी सात्विकी
करिं निवेदन सर्व आम्हां जें वर्तत लौकिकीं ५
दोन्ही कर जोडून योगिरायासि सांगुं लागली
जी झाली वर्तणूक जन्मापासुनियां मागली
पतिव्रता ही पतीनिकटची रात्रंदिस वागली
करी शांतवन इचें हृदयीं प्रतिसेवेसी जागली
ऐकोनि वर्तमान सर्वही चित्तवृत्ति डागली
म्हणे सांगतों तुला ऐक गे करिं युक्ती चांगली
म्हणे आतां रडुनी करतेस काय सांग गे
पति उठेल आणिक कसा फिटेल पांग गे
जा सती साध परलोक पुण्य धाम गे
रूदनें होतसे दुःख पतीला अती
तूं पतिव्रता म्हणविसी पहा तरी चित्तीं
साधावा परलोक असा पतीसंगतीं
सांगती मुनिजन दोन्ही शास्त्र विचारा
सांगतों तुला ग धर्म सर्व शाहणे
त्यांतील तुला जो योग्य दिसे तो बरवा

करिं विचार मनिं आपुल्या निश्चय पाहणें
एक पतिसहगमन एक पतिमागें राहणें
राहतां पतिमागें शाल्योदन खाऊं नये
निद्रा मंचकशयनीं कोणिकडे जाऊं नये
सत्संगिं सदां रहावें दुःसंगा जाऊं नये
निःसंग मनीं व्हावें अग्नीला भीऊं नये
उद्धरावि कुळी आपुली अपकीर्ती सेवुं नये
रुद्राक्ष गळां बांधी त्या अंतर देऊं नये
असा किती सांगुं धर्म दुःख दुसऱ्या देऊं नये
जाणोनीयां दोन्ही वर निश्चय केला निर्वाण कीं
जावें सहगमनिं पतिसवें प्राण ठेवूं नये नेणकीं ६
झाला निश्चय सहगमनाचा निघती झाली सती
दासदासींना मागें धाडिलें आल्या होत्या सांगाती
म्हणे सासुसासऱ्यांसि सांगा सुखि आहे दंपती
ग्रामवासी जन आले बघाया त्यांसी वर्णूं किती
विप्रस्त्रिया, ब्राह्मण अवांतर जाती जमल्या अती
स्त्रिया द्विजांच्या बहुत आल्या उभी सांगते निती
करिं धरुनीयां वनीं निघाली पतीसवें अतिप्रिती
गेली स्मशानीं हृदयीं तिच्या तिळभर नाहीं भिती
स्नान दान करुनियां धर्म केले बहुपरी
दिले होन द्विजांसीं वाणं वांटिलीं बरीं
रचिली चिता ठेविलें शव त्यावरी
सत्वर रुद्राक्ष आणी अती प्रीती

बांधी गळां पतीच्या आणी आपुल्या सती
तेव्हां आठवण स्वामीची झाली अवचिता
मनिं म्हणे स्वामिचं दर्शन घेइन आतां
स्त्रिया विप्रांसहित आली त्या आश्रमाकडे
लगबगीनें केलें पूजा करुनी नमन
' सौभाग्यवती हो ! ' परि देई आशीर्वचन
देतांच नमुनि म्हणे ऐसें कैसें घडे
सती सन्मुख उभी ठाकली पुढें
पुनरपि म्हणती स्वामी आशीर्वाद घे सती
जाई तूं गृहिं आपुल्या होसी गे पुत्रवती
आशीर्वाद देत स्वामी पहावें चित्तीं
परलोकवासि झाले हे समयीं माझे पती
आणूनि स्मशानासी रचियेली काष्ठ चिती
आठवण झालि आपुली दर्शनासि आली होती
जो दिला तो फिरेना आशीर्वाद या मुखीं
प्रेत आणा इकडे जाईल मरणाची काळोखी ७
जाउनि द्विजांनीं प्रेत आणूनी त्वरित ठेविले पुढें
रुद्राक्ष घेउनिया तीर्थ शिंपिलें चोहींकडे
जलस्पर्श होतांच शवानें आंग करुनि वांकडें
उठुनी बसतां पाहुं लागले जन सर्वहि त्याकडे
म्हणे क्रोधयुक्त स्त्रियेला मज कां आणिलें उघडें
जें झालें वर्तमान पतीला तें झालें सांकडें

मग उठुनि वस्त्र घेऊनि लागे स्वामिचरणां
झालि दिव्य काया गेले रोग सर्व हरुन
या कृष्णा-पंचगंगा संगमीं स्नान करुन
नरसिंहसरस्वतीचें जे घेतिल दर्शन
जातील मुक्ति अंतीं हें निःसंशय वचन
जाऊन मातापित्यांचें भेटून करूं समाधान
धनार्थ्यांशीं होय धन पुत्रार्थियासि पुत्र
बाळकृष्ण कवि म्हणे कृपाळू नाहीं ऐसा बाप कीं
घेतां दर्शन हरतिल पापें गाती संतांमुखीं ८

# अधिकमास

[ परिचय ]

चांद्रमास आणि सौरमास यांचा मेळ घालून निसर्गाच्या ऋतुचक्राशीं आपलें पंचांग मिळतेंजुळतें ठेवण्यासाठीं ज्योतिर्विदांना अधिकमासाची कल्पना करावी लागली. दोन वर्षे आणि आठ महिने इतक्या कालावधीनें अधिकमास येतो. स्थूल मानानें तीन वर्षांनीं येतो असें म्हणायला हरकत नाहीं. अधिकमासांत सूर्यसंक्रांति होत नाहीं. समजा, श्रावणांत संक्रांति वद्य चतुर्दशीला झाली तर पुढें एक महिना उलटल्यावर भाद्रपदात शुद्ध प्रतिपदेला होते. अधिकमासाला त्याच्या पुढच्या मासाचें नांव देतात.

ज्योतिर्विदांनीं याला मलमास म्हटलें आहे पण सामान्य जनांच्या भक्ति-श्रद्धान्वित मनाला तें नांव आवडलें नाहीं. मलमास या नांवांत जो एक अमंगलपणाचा ध्वनि निघतो तो त्यांना रुचला नाहीं. अधिकमासांत ना कुलाचार ना वाणवसा. ‘ येरे दिवसा भर रे पोटा ’ एवढेंच त्या महिन्यांत करावयाचें. तेव्हां हें बरें नव्हे असें वाटून त्यांनीं त्याचें नांव ‘ पुरुषोत्तममास ’ असें ठेवलें.

नांव बदललें कीं लगच भावहि बदलतो. प्रस्तुत मासाचा अधिपति पुरुषोत्तम–साक्षात् वैकुंठपति–आहे हें जाणिवेंत येतांच एक मोठी थोरली उपासना उभारली गेली. स्नानें, दानें, भोजनें यांनीं त्याचें माहात्म्य वाढलें. अनेक कथांची त्याच्याभोंवतीं गुंफण झाली. ‘ रोचनार्था फलश्रुति ’ इहपरसुखाचा ‘ लाहो ’ घेण्यासाठीं भाविक जनांना हाकारूं लागल्या.

‘ तीस तीन ’ ब्राह्मणांना भोजन अन् तितक्याच अनरशांचें वायन हा या मासव्रतांतला सर्वांत गोड भाग. पण तो आचरावा कोणीं? तर ज्यांचा हात चालता असेल अशा स्त्रियांनीं. दुर्दैवानें तशी अनुकूल परिस्थिति नसेल अशा बायकांची वाट काय? अंतरांत श्रद्धा ओसंडून वाहते पण हातांत रौप्यमुद्रा मात्र खेळत नाहींत अशा स्त्रियांनीं काय करावें? ‘ अधिकाचें वाण ’ देऊन भटजीचें आणि त्याच्या कुटुंबांतल्या मंडळींचें तोंड गोड केल्यावांचून देव

आपलें तरी तोंड गोड कसें करील, अशी ज्याना तळमळ लागली आहे त्यांना मार्ग कोणता?

तो सांगण्यासाठींच कवयित्रीनें प्रस्तुत काव्याला जन्म दिला आहे. तिची दृष्टि वर नाहीं; खालीं आहे.

**परि द्रव्यहीन ज्या युवती**
**न करावी त्यांनीं खंती**

म्हणून पुरुषोत्तम-व्रत आचरण्याची ' सोयिस्कर रीति ' तिनें विशद करून सांगितली आहे. तिला दीन-दुबळ्या स्त्रियांची कणव आहे. त्यांच्या श्रद्धेची उपासमार होऊं नये अशी तळमळ आहे. कोणत्याहि पोथीपुराणांत न सांगितलेलें विधान स्वतःच्या द्रष्टेपणानें तिनें कथन केलें आहे. काव्यापेक्षां-सुद्धां या तिच्या भावनेलाच मला धन्यवाद द्यावेसे वाटतात. ती म्हणते,

" आयांनो, बायांनो! तुम्हांला वायन द्यायचं आहे ना? मग मी सांगतें तसं करा. परमात्म्याचीं असंख्य नामं हेच तांदूळ समजा अन् त्यांतले तुम्हांला हवे तेवढे घ्या. ते भक्तीच्या पाण्यांत भिजवा. नवविधा भक्तीच्या भजनाच्या उखळांत घालून दृढनिश्चयाच्या मुसळानं ते कुटा. त्यांत प्रेमाचा गूळ मिसळा. मनावरचे तरंग ही खसखस लावून त्याचे अनरसे थापा अन् सद्विचाराच्या तुपांत तळा. तळण्यासाठीं षड्रिपूंचें जळण घाला. असे तेहतीस अनरसे झाले कीं तुमचं काम झालं. आपले देवहि तेहतीस कोटीच आहेत. प्रत्येक कोटीला एकेक अनरसा. सगळ्यांना अंशभाग मिळेल. सगळेच तुष्ट होतील."

या कवयित्रीचा हा अनरसे बनवण्याचा प्रकार कोणत्याहि पाकशास्त्राच्या पुस्तकांत आढळायचा नाहीं. हा शुद्ध पारमार्थिक ' फॉर्म्युला ' आहे. एकनाथ महाराज हे या सुग्रणपणांत तिचे गुरु असावे. कारण त्यांना असल्या ' परी ' उत्तम प्रकारें रांधतां येतात. त्यांच्या वाङ्मयांत असल्या अलौकिक परवडींचा आस्वाद वाचकाला मिळतो.

प्रस्तुत अनरशांच्या रूपानें तिनें एक परमार्थिक साधनेची चढती श्रेणी मायभगिनींच्यापुढें उभी केली आहे. नामस्मरण ही तिची पहिली पायरी अन् षड्रिपूंची राख झाल्यावर एकमेव उरणारा श्रीहरीचा निदिध्यास ही त्यांतली वरची पायरी आहे. असल्या या अव्यक्त अनरशांचें दान घ्यायला कोणताहि पुरोहित राजी होणार नाहीं हें कवयित्रीला माहीत आहे. म्हणून

ती म्हणते कीं, हें वायन तुम्ही साक्षात् पुरुषोत्तमालाच अर्पण करा. मध्यस्थ हवा कशाला? भावाचा भुकेला भगवान् तें 'दे दे' म्हणून घेईल अन् चारी हातांनीं तुमचें 'अघ-दुःख-दैन्य' हरून नेईल.

---

## अधिकमास

त्रैवार्षिक हा अधिकाचा महिना आला
कलिमलहर भव तरण्याला
या मासिं वायनें देती भूदेवाला
चिरकाल सौख्य वरण्याला
    सौभाग्य चिर स्थिर व्हाया । हो
    धनधान्य पुत्र लाभाया । हो
    पूर्वार्जित दोष हराया । हो
संसारवैभवें, सौख्यें सुंदर जानें मिळण्याला
अंगना प्रार्थिती प्रभुला १
पुरुषोत्तम हा जगता उद्धरण्याला
त्रैवार्षिक महिना आला ॥ धु० ॥
किति अनारसे अपुपांचिं वायनें देती
किति द्विजसंतर्पण करिती
किति तीर्थातें जाती दानें देती
पुरुषोत्तममहिमा गाती
सारांश पुण्य-कर्मातें जन अनुसरती
सन्मार्गसेवनीं रमती
    परि द्रव्यहीन ज्या युवती । हो
    न करावी त्यांनीं खंती । हो
    त्यांकरितां उत्तम रीती । हो

कळवितें अती सोयिस्कर दीन जनांला
पुरुषोत्तमव्रत करण्याला २
अगणीत हरी-नामाचे तांदुळ घ्यावे
ते भक्तिजळीं मिसळावे
भजनउखळीं दृढनिश्चय मुसळिं कुटावे
ते प्रेमगुळीं मिसळावे
मनतरंग ही खसखस लावुनि त्यां थापावे
हृदयाच्या तबकीं बरवे
    सन्मतिच्या कढईत बरवें । हो
    सद्विचार घृत घालावें । हो
    षड्रिपूकाष्ठ जाळावें । हो
निजध्यास जाळ हा प्रज्वळ लावुनि त्याला
झणिं तळा अनरसीयाला ३
खुसखुशीत खरपूस ऐसे रुचिकर नामी
अर्पावे प्रभुच्या नामीं
दरएक कोटी, देवास एक या परींनीं
तेहतीस अनरसे करुनी
हें प्रेमपुरस्सर, वायन अर्पितसें मी
पुरुषोत्तमप्रभुचे चरणीं
    मागतें पदर पसरोनी । हो
    दे भक्ति तुझी दिनरजनी । हो
    अघ—दुःख-दैन्य ने हरुनी । हो
सौभाग्य अखंडित राहो हे जगपाला
मी शरण तुझ्या पदकमला ४

— समाप्त —